ह्या मितीत पुण्याचे सरहवालदार रावो भास्कर यास संभाजीराजानीच लिहिलें आहे ले. ४०० पुणे होनप देशाडि दप्तरांतहि ह्या पट्टीचा ' साल गुदस्ता सन समस ( म्ह शक १५९६ इ १६७४ ) हुजरातीहून नख्तपटी गांवगना कुलकरणावरी घातली (पेर्की) क्यांत मावळावर १२०० होन घातली ' असा मजकूर श १५९७ च्या पत्रांत आला आहे (शि च सा स २ ले ११२ पहा), शि च सा स १ मध्ये तर शिरवल परगण्यांतील मुमारें ५० गांवावर व खुद्द देशमुख देशकुलकर्णी व गांवकुलकर्णी व गांवपाटील ह्यावर ही पट्टी किती किती आकारला त्याचा ' मिरासपट्टीचा सिस्त जाबता'च विस्तृतपणें आला आहे (ले ५५,५६). सारांश, अशी ही सिंहासन पट्टी किंवा मिरासपट्टी शिवाजीनें वतनदार मडळींवर राज्याभिषेकाचे वेळीं आकारली होती व त्यांतील ही हुकेरी परगण्याचे देशमुख–देशपांड्यावरील आकारणी होय ह्या आकारणीचें प्रमाण काय हें येथें सांगावयास पाहिजे पण तें प्रस्तुत सांगण्यास पुरेशी सिद्धता नाहीं कारण, आकारणीप्रमाणें उत्पन्नाचे आकडे मिळाले पाहिजेत शिवाजींचा वतनदार मडळींवर रोष होता हें अन्यत्र प्रसिद्धच आहे व त्याशीं ही पट्टीची बाब जुळतीच आहे.

* ह्या सिंहासन पट्टीचा उल्लेख इतिहास–साधनग्रथांत इ स १९१४ सालींच प्रथम प्रकाशित झाला व त्यानतर इ १९२६, १९३० ( मधील दोन ग्रथ ) १९३७ मध्यें प्रसिद्ध झालेल्या ग्रथातून तो उल्लेख येत राहिला आहे ह्यापैकीं एका ग्रथांत तर ' शिवाजी शकावली ' स्वतत्र देऊन त्यात ह्या पट्टीचा स्पष्ट निर्देश पुरवणींत केला आहे ' शककर्ता शिवाजी ' ह्या रा ब सरदेसाई यांच्या ग्रथात वा सर जदुनाथ सरकार यांच्या मराठी ग्रथांत ह्या बाबीचा उल्लेख येण्याचें राहिलें आहे असें वाटतें म्ह- आला नाहीं

• **राजशक**—अर्वाचीन इतिहासप्रभु शिवाजी राजा ह्यांनी स्वराज्यसस्थापना केली म्हणजे राज्याभिषेक स्वत स करवून घेऊन छत्रपति म्हणवून त्या दिवसापासून ' राज्याभिषेक शक ' चालू केला ह्याच्या इतका दुसरी रमणीय व स्फूर्तिप्रद चांगली गोष्ट नाहीं असें असतां, ह्या राजशकासबधानें बऱ्याच इतिहासज्ञ व विद्वान् म्हण विणाऱ्या मडळींकडून भलत्याच विपरीत कल्पना पुन पुन प्रकट होत असल्याचें दिसून येतें कोणी आधार देऊन ती आपली कल्पना मांडतात तर कोणी आधार प्रत्यक्ष न दर्शवितां पण तेंच म्हणणें आपल्या ग्रथांत प्रकाशित करतात हें म्हणणें व त्याचा आधार ह्यांची चर्चा आधीं करण्यापेक्षां स्वत राजशकासबधींची वास्तव स्थिति काय होती हें, इतिहासांतील तो शक असलेल्या व नसलेल्या प्रत्यक्ष उदाहरणांवरून म्हणजे मूळ पत्राधारोंच लक्ष्यांत घेतलें असतां सत्य ज्ञान होण्याच्या दृष्टीनें त्याचा उपयोग अधिक होईल व तेंच येथें इष्ट आहे नंतर विपरीत वा चुकीच्या कल्पना ज्या आधारें ज्यांनीं मांडल्या त्यांच्या त्या आधारांतून त्यांनीं स्वीकृत केलेला अर्थ मूलसिद्ध

नाहीं हें कळल्यानें राजशकाविषयींची मुळांत वस्तुस्थिति काय होती त्याचें ज्ञान होण्याचें शिल्लकच राहील म्हणून तेंच प्रथम थोडक्यांत लक्ष्यांत घेऊ ,

राज्याभिषेक शकाचें संक्षिप्त नाव 'राजशक' हें आहे श १८३४ इतिवृत्त पृ २१९ वर 'करवीरकर वंशावळी' छापली आहे त्यांत आणि धडफळे यादींत ( श १८३५ इ वृ पृ १७८ कलम ४ मध्यें ' राजशक " असा निर्देश राज्याभिषेक शकाकरतां आला आहे शेडगावकर बखरींत शिवराज्याभिषेकापासून तों महाराष्ट्रसाम्राज्य समाप्तिपर्यंतचें सर्व वृत्त देताना जेथें म्हणून कालनिर्देश करण्याचा प्रसंग आला तेथें बहुधा प्रत्येक स्थलीं 'राज्याभिषेकाचा निर्देश 'राजशक' ह्या नांवानेंच केला आहे. असा हा 'राजशक' प्रत्यक्ष कागदोपत्री येतो तेव्हां 'स्वस्ति श्रीराज्याभिषेक शक' असून म्हणून आंकडा देऊन पुढें संवत्सरनांव, महिना, मिति, वार, अशा प्रकारें यावयाचा पण तो शक, कांहीं विशिष्ट प्रकारच्या पत्रांवरच यावयाची रीति आहे इतिहासकालीन कोणत्याहि पत्रावर तो यावयाचा, असा प्रकार नाहीं स्वतः **शिवाजी राजांनींच हा शक आपल्या राजवटींत वापरला नाहीं अशीं कांहीं पत्रे** आहेत श १५९६ ज्येष्ठांत ( श १३ ) हा शक सुरू झाला त्यानंतर त्याच वर्षींच्या माघांत सुभे प्रभान वलीच्या सुभेदाराला, ' तो हवशाला फितुर झाल्याचा संशय घेऊन ' ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करतो ' (तुम्हांस) खरा नतिजा ( शिक्षा ) पावेल " असा योग्य धाक दिला आहे त्या पत्रांत मुहुर सनच आहे राजशक नाहीं ( पद्रा स ८ ले ११ व चांदोरकर भाग १, ले १९). पुढल्या म्ह श १५९७ ह्या वर्षींचीं व विनाराजशकाचीं पत्रें समय मोरव्याचीं पत्रें भा १ ले १३. शि च सा स २ ले २५५ ते २५१

आक्षेप असा की, ' हा शक १०४ वर्षे चालला, पुढे हुकूम काढून बंद केला गेला.' म्हणजे शक परिमाणेने श १६९९ पर्यंत किंवा इ. स. १७७७ पर्यंतच हा राजशक चालला अर्थात् राजशक १०४ च्या अलिकडील उदाहरणें पाहण्याचें कारण नाहीं, पुढील कालची पहावयाचीं. 'धर्म' मासिकांत (वर्ष २ इ १९०४) पृ ७०७ वर करवीर छत्रपतींनी दिलेल्या सनदा छापल्या आहेत त्यांत 'राजशक १०६' ची सूर्यग्रहण-प्रसंगानें ताळें तर्फेमधील मालवे हा गाव दान दिल्याची सनद आली आहे. व ती नक्कल असली तरी समकालीन नक्कल असून प्रमाण व विश्वसनीय ठरण्यास लागणाऱ्या लक्षणांनी युक्त आहे. ह्यापेक्षा सातारकर छत्रपतींच्या सनदा लक्ष्यांत घेणें एका अर्थी अधिक इष्ट. ऐ पत्रव्यवहार-द्वितीय आवृत्ती, संपादक रा. ब. गो. स. सरदेसाई, ह्या ग्रंथात ले. २९८ ही राजसनद 'राजशक ११९' ची आली आहे. ह्याच ग्रंथात ले ३२० हें पत्र 'राजशक १२१' चें असून तें स्वतः नाना फडणवीस यानाच दुसऱ्या शाहू छत्रपतींनीच, सवाई माधवराव वारल्यामुळे पुढील व्यवस्थेबद्दल लिहिलेलें आहे. आठव्ये प. इ ले ८३ हें राजशक १३४ चें पत्र आहे. अशा पुढल्या पुढल्या राजशक असलेल्या सनदा किती तें सर्व येथें देऊन जागा अडविण्याचें कारण नाहीं. कारण, तशा सनदा पुष्कळच आहेत. म्हणून छत्र प्रतापसिंहमहाराज काशीस जाईपर्यंतच्या ( इ. १८३९ ) सनदा राजशकाच्या होत होत्या हें जरी एकाच उदाहरणानें दाखविलें तरी प्रस्तुत पुरें होईल तशी सनद राजशक १५६' मधील मंडळाच्या १८३७ च्या इतिवृत्तात पृ २२७ वर प्रकाशित झाली आहे.

**सारांश, राज्याभिषेक शक १ पासून तों राज्याभिषेक शक १५६ पर्यंत म्हणजे इ. १६७४ पासून तों इ. १८२९ पर्यंत 'राजशक' अखंड चालू होता हें साधार म्हणतां येतें.**

आतां हा 'राजशक' महाराष्ट्राचें स्वराज्य चालू होतें तोंपर्यंत अखंड चालू असतां त्याविरुद्ध म्हणजे तो बंद केला, असा आक्षेप, ज्या आधारानें केला त्याचा आणि राजशक कोणत्या पत्रावर मुख्यतः यावयाचा त्या विषयीच्या नियमाचा, विचार करावयाचा.

त्यांतहि आक्षेपासंबंधानेंच आधी विचार करणें बरें कारण, जर ऐ० कालांतील एखाद्या साधनीभूत वाक्यान्वयें किंवा कलमावरून हें विधान केलें असेल तर, प्रत्यक्ष इतिहास काळांतील राजशकांचीं पत्रें प्रसिद्ध असणें आणि तोच शक बंद केला गेला असें विधान करविणारा आधारहि इतिहासकालांतीलच असणें ह्या परस्परविरुद्ध गोष्टींचा मेळ घालणें हें सहजच एक कोडें होय. म्हणून तें प्रथम विचारांत घेतलें पाहिजे

ह्या शकासंबंधानें ' हा शक १०४ वर्षे चालला. इ. स. १७७७ त दुसरा शाहू गादीवर आला त्या प्रसंगी सखाराम बापू व नानाफडणीस यांना तो गैरमोर्याचा

वाटला आणि त्यांनीं हुकम काढून तो बंद केला ( धडफळे यादी ) ' असें विधान[1] केलें आहे. असेंच ' शेवटीं तर राजशकहि नानाफडणिसानें बंद केलेला दिसतो ' ह्या प्रकारानें ( म्हणजे येथें एक नाव नाही ) अन्यत्र[2] केलेलें आहे. ह्या विधानाचा आधार ' धडफळे ' यादी हा वर दिलाच आहे. ह्या यादीचा लेखक चिंतामण लक्ष्मण धडफळे. ह्या ' यादी ' प्रमाणें ख ६ पृ १ ते १२८ व पुरंदरे दप्तर भा ३ पृ १०३ ते १११ मधील 'स्मरणें'ही ह्यानेंच लिहिल्याची समजूत आहे प्रस्तुत 'धडफळे यादी' मंडळाच्या १८३५च्या इतिवृत्तांत पृ. ३७५-३९९वर आली असून त्यांतील पृ. ३७८ वरील एका कलमात "दुसरा शाहूच्या राजकारकीर्दी (त्या काळात) त राजपत्रें होत नाहींत पतप्रधान यांनीं मना केली आहेत. राजशक १३४ ला हा शाहू वारला इ." आलें आहे. याचा अर्थ हा राजशक ह्यापुढें कायमचा बंद केला इतका मुळींतच होत नाहीं. दुसरी गोष्ट, ह्या यादींत आणखी अशा कितीतरी चुका आहेत. समाजीची कारकीर्द २ वर्षें कमीच सांगितली आहे; राजारामाची कारकीर्द संभाजी मेल्यावर सुरू असें म्हटलें आणि कारकीर्दीचा प्रारंभ सांगतांना संभाजी मरण्याच्या आधींचेंच एक वर्ष दिलें आहे, राज्याभिषेकाचीं वर्षे सांगतांना शकाचें नांव राजशक असें दिलें पण प्रत्यक्ष राज्याभिषेक वर्णन व शकोल्लेख केला तेथें शिवशक असेंच म्हटलें आहे, शहाजी राजा मुरारजगदेवाबरोबर पुण्यास श. १५५५ मध्यें आला, थोरले बाजीराव मृत्यु पावल्यानंतर बाळाजी बाजीराव यांस प्रधानकीची वस्त्रें मिळण्यास एक वर्ष लागलें, इ. इ. असा विपर्यस्त मजकूर ह्या यादींत आहे. हा असला मजकूर असलेली यादी ही स्वयंप्रमाण नसल्यानें—नाहीं हें त्याच छत्रपतींच्या कारकीर्दींत ज्यानीं बंद केला असें म्हटलें त्या नानाफडणिसानाच पाठविलेल्या राजशक असलेल्या पत्राच्या उदाहरणावरून सिद्ध आहे.—अन्यत्र आढळणाऱ्या विश्वसनीय आधारानें पडताळून पाहिल्याशिवाय त्यांतील एखादें वाक्य बिनपारख उद्धृत करतां येत नाहीं; व तसें इतर बाबतींत ह्या ग्रंथकारांनीं केलेंहि आहे. मग हेंच वाक्य असें कां लक्ष्यांत घ्यावेसें त्यांना वाटलें ? असो त्याचा विचार करण्याचें येथें कारण नाही, तो वाचकांवर सोपविणें बरें. राज्याभिषेकाची वास्तव स्थिति काय हेंच थोडक्यांत येथें आधारासह पहावयाचें आहे.

राजशक नाहीं अशीं जी वर केवळ शिवाजी कारकीर्दीपुरतींच उदाहरणें दिलीं 'ती व तशींच पुढल्या कारकीर्दींतीलहि पाहिल्यास त्या विषयीचा कांहीं नियम अदाजण्यास साहाय्य मिळेल शिवाजीच्या कारकीर्दींत जीं पत्रें ' परवानगी हुजूर ' ह्या पत्रसमाप्तीच्या श्रेण्याचीं आहेत त्या पत्रावर सामान्यतः राजशक यावयाचा नाही.

---

१ रा. ब गो. स सरदेसाइ ' शककर्ता शिवाजी ' पृ. १६३

२ विद्यानिधी सिद्धेश्वरशास्त्री चित्रावकृत मध्ययुगीन चरित्र कोश पृ ७६८ 'शाहू चरित्र.'

'सामान्यत' चें पालुपद अशासाठीं जोडावयाचें कीं, ह्यासहि १, २ अपवाद आहेत शिवाजीच्याच कारकीर्दीतील युवराज संभाजीनें जीं पत्रें पाठविलीं–वर सिंहासनपट्टी वरील विवेचनांत अशा पत्रांचा निर्देश स्पष्ट आलाच आहे.–त्याहि पत्रांवर राजशक नाहीं मोरोपंत पिंगळे पेशवे व अनाजी दत्तो सचीव ह्यांनींहि लिहिलेल्या पत्रावर राजशक कांहीं अपवाद वगळून नाहीं शिवाजी राजांच्या राजवटीतीलच पण शिवाजीचीं नसलेलीं आणि राजशक असलेलीं अशीं पत्रें मोरेश्वर पंडितराव यांचीं आहेत गो इ सा ले ३१, ३२; पद्य साराग्रह १८९८, १८९९ तात्पर्य वर सांगितलेल्या नियमासेरीज दुसरा अस्तिपक्षी नियम असा सांगतां येईल की, छत्रपतींच्या पत्रांपैकीं फक्त राजसनद जेवढी नेवडीवरच ती यावयाचा ह्यासहि अपवाद आहेत व त्यासह सर्व बारीक तपशील येथें देणें आज शक्य नाहीं

शिवकारकीर्दीनंतरहि पाहू गेल्यास हाच नियम अवलंबिलेला आहे **शाहू आणि संभाजी ह्या दोघां छत्रपतींमध्यें जो तह झाला त्यावरहि हा राजशक नाहीं** हा बाणेचा तह काव्ये स पत्रें यादींत ले ३४ मध्यें, 'तहकरारमदार' ह्या मथळ्यानें पृ ४३, ४४ वर, राजवाडे स २० ले ३८२ स २ पृ ६२ व शा रो पृ ८६ इतक्या ठिकाणीं आला आहे. पैकीं स २० मधील तहांत राजशक ३४ हा दिला आहे पण तो गणितदृष्ट्या जमत नाहीं शिवाय तो शाहू व शिवाजी–म्हणजे ताराबाई पुत्र–ह्यांमध्येंच व श १६२९ म्ह. इ १७०८ मध्येंच झाल्याचें आलें आहे. अर्थात् हें युक्त व ग्राह्य नाहीं सारांश, शाहू व संभाजी ह्यांमधील संधिपत्रावरहि जेथें राजशक नाहीं तेथें छत्रपती व अधिसरसेल, वा सावंतवाडीकर इत्यादिकांशीं झालेल्या करारनाम्यावर तर नाहींच नाहीं इत्यर्थ कीं, राज्याभिषेक शकाचा वापर हा असा विशिष्ट व मर्यादित पत्रांवर पण अखंड आणि बिनचूक चालू असे

**शहाजी–बाजी सलोखा**—ह्या सदरांत ज्या सातआठ नवीन घराण्यांचे शिवकालीन किंवा शिवपूर्वकालीन कागद प्रसिद्ध होत आहेत त्यांत राजकीय दृष्ट्या राजेघोरपडे देशमुख नांदगांव–तासगाव, ह्यांजकडील कागदास प्रमुख स्थान द्यावें लागेल हे घोरपडे व मुधोळकर घोरपडे एकाच घोरपडे घराण्यांतील होत, असें हें कागद देणारे आपल्या प्रस्तावांत म्हणतात आणखी त्यांचें म्हणणें ले. ७३ वरून असें कीं, मुधोळकर प्रसिद्ध बाजी राजेघोरपडे व राजे शहाजी भोसले ह्यांमध्यें परस्पर विनुष्ट वाढून उभयतांत जी चांगलीच तेढ माजून राहिली होती ती कांहीं कमी होऊन, ह्या दोन्ही पराक्रमी सरदारांचा आपल्या 'शाही'स चांगला उपयोग व्हावा म्हणून मुहम्मद आदिलशहा यानें इ १६५२ च्या सुमारास देशमुखकडून आपापल्या देशमुखांपैकीं कांहीं उत्पन्नाची अदलाबदल करवून सलोखा घडविला ह्या दोन्ही गोष्टी अगदीं नवीन आणि महत्त्वाच्या होत ह्यांत संशय नाहीं पण त्या सर्वांशीं प्रमाण मानण्यास ह्यासंबंधींचे व विश्वसनीय कागद प्रसिद्ध झाले पाहिजेत वशावळ दिली आहे ती

प्रयत्नर पुरावा मिळून प्रमाण ठरणें प्राप्त आहे. कारण, ज्या बाजी घोरपड्यांच्या मुलाचा व तोही थडील असलेल्या मुलाचा, तो, स्वराज्य शासेस मिळाला म्हणून त्याचें वंशावळींतून नांव काढलें असें म्हणावयाचें, तो नावजी हा स्वराज्य-शासेस केव्हां मिळाला, तसेंच, ह्या मुलाला बाजीनें आपली पाटिलकी व देशमुखी समाळण्यास सांगितलें असतां तें त्यानें ऐकिलें नाहीं हेंहि केव्हां, तेंहि ठरविणें भाग आहे. कारण, शिवाजी राजाकडे साताऱ्याकडील प्रदेश जो ह्या घोरपड्यांकडे वतन म्हणून आहे तो बाजीराजे घोरपडे मृत्यु पावल्यानतर आठनऊ वर्षांनीं आला बाजी घोरपड्यांनीं मुलाला सांगितलें तें अर्थात् आपल्या मरणापूर्वी म्हणजे श १५८६ ( इ १६६४ ) पूर्वी पण प्रस्तुत छापलेल्या कागदावरून ( ले ७४ ) म्हणतां येतें कीं, सताजी घोरपडे यांनीं म्हणजे नावजीच्या मुलानें वतन चालविण्यास मुतालिक ठेविला होता, नावजीनें नाहीं वतनाविषयींचें वृत्त कथन करणाऱ्याचा नावजी हा आजा होय वृत्त-कथक बाजोजी म्हणतो कीं, वतनावर मुतालीक बापानें ठेवला होता ह्यावरून, नावजी हा वतन चालवीत होता, असें जर म्हटलें तर तें अयुक्त ठरणार नाहीं म्हणजे नावजी हा वतन-वाडीवर बाजाराजे याच्या सांगण्याप्रमाणें आला नाहीं असें जें प्रस्तावात आलें आहे, त्या न येण्याचा काल कोणचा हें कळणें प्राप्त आहे. तसेंच साताऱ्याकडील प्रांत स्वराज्यांत येण्याचा काल वर दर्शित केलाच आहे ताहि लक्ष्यांत घेऊन ह्या दोन्ही गोष्टा निश्चित होणें इष्ट शिवाय, वंशावळींत नाव दाखल न करण्याचें कारण आलिकडील असलें तरी जुन्या वंशावळींची प्रमाण व अस्सल प्रत उपलब्ध झाल्याशिवाय ह्या गोष्टींविषयीं निर्णायक असें बोलतां येणार नाहीं कारण दिलेल्या वंशावळीं, लेखांकानुसार पाहतां कांहीं नांवें नाहींत आणि वंशावळींत जी दुसरीं नावें आहेत, तीं लेखांकांत नाहींत पहा भाइळे घोरपडे शि च सा स ५ प्रकरण ४८ व प्रस्तुत खंड ले ७४ घोरपड्यांच्या अ यत्र छापलेल्या वंशावळींत व प्रस्तुत ले ७४ मधाल वंशस्थ मंडळींतहि भिन्नता दिसून येते नावजी किंवा नहुजी किंवा प्रतापराव याचा बाप, चुलता व आजा ह्यांच्या नांवांत व पिढींतहि बिनमेळ आहे असो तर ही घोरपडे यांचीं शाखा निश्चित आहे. पण निच्या इतिहासवृत्तासह ती अधिक विश्वसनीय ठरण्यास कागद व तेहि मूळ कागद बाहेर येणें अवश्य आहे, असें वाटतें

घोरपडे घराण्याच्या नव्या शासेचा वंशावळीच्या दृष्टीनें हा विचार झाला ह्या घराण्याच्या कागदांतील मुख्य महत्त्वाची बाब जी शहाजी-बाजी सलोखा याचा आता विचार करू. ह्या सलोख्याचा कागद जो उभयतांमधील शर्तनामा ले ७३ हा आला आहे त्याचीहि तत्कालीन प्रत मिळणें अवश्य आहे, हें प्रथम सांगणें इष्ट वाटतें प्रस्तावांत जरी तसें म्हटलें असलें तरी तेथेंच आम्ही सशय दर्शित केला आहे आणि येथें त्याविषयीं विशेष स्पष्टता अशी कीं, प्रस्तावांत सांगितलेल्या दोन्ही प्रती एक राजाराम कालीन व फोटोप्रत तर पेशवेकालीन आहे दुसरी, ह्या शर्तनाम्यावरील कालोल्लेख

संबधानें प्रस्तावांतच चूक म्हणून सुचविलें आहे व टीपेंतहि तसा खुलासा केला आहे शर्ननाम्याची मूळ प्रत व शर्ननाम्याचा काल, ह्यांहिपेक्षां विशेष लक्ष्य गोष्ट ही की, बाजी घोरपड्यानें जी आपली त्रिणामल परगण्याची देशमुखी शहाजीस देऊन शहाजीची कऱ्हाडची देशमुखी-काही भाग-घ्यावयाची ती बाजीस मिळाल्याचा आधार दर्शित होणें अवश्य आहे त्रिणामलचें मूळ नाव तिरुवन्नामलय ह्या परगण्याचें उत्पन्न 'चक्र ह्या नाणेरूपात शर्ननाम्यात सांगितलें आहे तें युक्त आहे तसेंच शहाजी राजाकडील कऱ्हाड देशमुखीपैकीं २२ गांव बाजीस देण्याबद्दल लिहिलें आहे तीहि देशमुखी खड १५ ले १, ३ पृ १४, १५ वर शहाजीकडे असल्याचें स्पष्ट दृष्ट आहे. तथापि त्रिणामल परगण्याची देशमुखी बाजी घोरपड्यास मिळाल्याचें मराठी इतिहासविषयक पुस्तकांत कोठें आढळत नाहीं ह्याच शर्ननाम्यावरून ती त्याजकडे असल्याचें गृहीत धरण्यास, हा शर्ननामा वरीलप्रमाणें तितका स्वयप्रमाण दिसत नाही पण ह्या दोन्ही गोष्टी पूर्ण मान्य करण्यास अधिक आधाराची अपेक्षा बाळगणाऱ्या असल्या तरी महत्त्वाच्या व विचारांत घेण्याजोग्या आहेत हें निःसशय होय व ह्या दृष्टीनें श्री बा बा राजे घोरपडे ह्यांचें अभिनदन करणें इष्ट आहे.

घराण्याचे दृष्टीनें जाफराबाद समतपैकीं कागी तव्याचे देशमुख, हुकेरीकर देशपांडे, पसरणीचे पाटील व हे नांदुर्गांवचे राजे घोरपडे देशमुख ह्या नवीन घराण्याप्रमाण ह्या खडांतील इतरहि वतनदार घराणीं आपापल्यापरीनें नवनवीन माहितीचा कारभार महाराष्ट्रेतिहासदेवतेला प्रसिद्धपणें देत आहेत

**परसाईपणाचें वतन**-हें गावकीचें वतन असून कांही ठरावानें मूळ धन्यापासून पेना येई व तो टराव रुपला की परत धन्याकडे जाई हें कन्हदेश-खानदेश भागाकडील आहे हें जोसपणाला जोडून आहे. ह्या वतनाचें काम म्हणून 'जातक व सुतक व दही, दूध व पत्रावळी द्याव्या' हें ले ५० मध्यें आलेलें दिसतें ही वतनयाद्य अगदीं नवीन व लक्ष्यांत घेण्याजोगी आहे.

ले ५ हा प्रसिद्ध पानसे घराण्याच्या इतिहासांत उपलब्ध आधारापेक्षां ५० वर्षे मागचा आधार देणारा आहे,हें टीपेंत तेथें दर्शविलेंच आहे त्या लेखाकांतील 'पिशुन' शब्दानें दर्शित केलेल्या अर्थाची अधिक स्पष्टता येथें करतों गिधवे आणि पानसे ह्यांत यजमान व उपाध्ये असा सबध असून शिवाय आप्तसबधहि आहे व तो सांग तांना पिशुन शब्द योजिला आहे. स १८ पृ ८६ ले ५८ मध्यें 'गिधव्यांनी आपली कन्या पानसियासी दिल्ही होती तिजला दोन गांव सोनोरी व दिये हे आदण दिल्हे' असा मजकूर आला आहे. तेव्हां गिधवेपानसे यांत आप्तसबध व तो कसा हें पूर्ण स्पष्ट होत आहे. आतां, हा अर्थ पिशुन शब्दाचा कसा हा निराळा प्रश्न आहे.

ले ६ मधील लेस शकलेसन पद्धतीचा एक विशेष म्हणून मुळावरूनच पुन घेतला आहे ही शकलेसन-पद्धती तसेच राज्याभिषेकशक-लेसपद्धतीतील शाहा प्रकार पाहण्याजोगे आहेत स ६ पृ १२९ ले २ मधील सनदेंत 'राज्याभिषक' एव ढेंच म्हटलें आहे शक शब्द नाहीं ह्याच सनद इ ऐ वि वि अ ७ पृ ३० वर आणि चिटणीस घ० स माहिती पुस्तक १ पृ १७ येथें छापला आहे एकांन राजकार्यधुरंधर तर दुसऱ्यांत राजकार्यलेसन धुरंधर असा फरक आहे. इतर थोड थोडे फरक आहेत १८०६ इ वृ पृ १५० वर शक १७३० ह्यासच राज्या भिषेकशक म्हटलें आहे ह्यावरून अस्सल सनदेचा आवश्यकता किती व कां हें ध्यानीं येईल असो

ह्या सर्वांत करपट्ट्या कोणकोणत्या लेसांतत आल्या आहेत तें विषयसूचा वरून कळून यईल या सगळ्या पट्ट्यांचें विवेचन येथें करणें प्रस्तुत अशक्य पण ज्या विषयीं कांहीं लिहावयाच हें आम्ही मचित केलें तेवढ्यापुरतें लिहिणें प्राप्त आहे निकालु' 'पैसालु,' अनप याहाल पड' ह्या पट्ट्या ले ७ मध्यें देशमुखांचे हक्क सांगतांना आल्या आहेत 'निकाल व पैसारु -लु-ळ हा गावांतून जाणाऱ्या व येणाऱ्या विका वस्तूवरील कर आहे. निर्गमादाय नाम तु निकाल व 'पेजाल नाम दोषज्ञैः प्रवेशादाय ईरित ॥ ०५० ॥ दाय ( शि च मदीप पृ १७२ राजव्य कोश ) ह्या दोन्ही पट्ट्यांचा उल्लेख इ वृ १८३८ पृ १६८ वर ५३ व्या ओवींत आला आहे. पण तेथील उल्लेखांवरून कांहींच अर्थ निष्पन्न होत नाहीं ह्या दोन्ही करांचा आकार म्हणजे प्रत्येकी दर गाणीस अर्धा अडका हा ह्या कारा तध्याच्या देशमुखांना मिळावयाचा असाच पौष पौर्णिमेच्या दिवसापुरता तुळजापूरमागामधाल नावागेऱ्या धरील 'अनप' म्हणून कर असे ताहि ह्या देशमुखांची प्राप्ती असे ह्या 'अनप' बाबीचा समावेश 'पूर्विया' सदराखालीं इ वृ १८३२ पृ १३४-१३५ वर आला आहे. ह्याच पूर्विया ला १८३४ च्या इ वृ त पृ ४१ वर जुजुया म्हटलें आहे कीं काय न कळे कारण, ह्या जुजुयाच्या पोटीं अनूपचा निर्देश तेथें केला आहे. या ओव्या अशा-आतां जुजुया कैसी । नाना बाबींची साठवण ऐसी । ते सांगता शेणवयासा । सताप वाट ॥ १०० ॥ जात्रा बाजार मेळ बोलावी । आनप तरी नाव जाणावी । टाकरा थडिया एशिया नावी । बाबा देता ॥ १०१ ॥ (जलप्रायमनूप स्यात्। ) अनूप वरून अनप शब्द आला असावा अनप म्ह जलोत्तारणाचा नावेवराल कर चवथा म्याहालपेड पट्टा वृक्षसरया त विद्वद्भिश्चया याहल तस्करा ॥२४०॥ रा व्य म्याहल व पड हे दोन्ही शाड ह्या अर्थाचे शब्द असून ह्याच नांवानें झाडासमर्धाची पण सांगितली आहे. व तिचा अर्थ प्रस्तुत लेसात आंबा चिंच व भोकर ह्या तान झाडावरील फळें देशमुखांना त्या वृक्षराजींतून मिळावयाचीं असो निहाल हा अरबी शब्द व पड हा हिंदी शब्द आहे.

१ शिराळकर निंबाळकर देसाइ यांच्या कागदांवरून (ले २४-४२) (१) अफजलखान श १५६७ (इ स १६४५) शिराळे परगण्याचा मोकासदार होता ही गोष्ट येथें प्रथमच नजरेस येत आहे. तसेंच हा परगणा रामचंद्रपंडित अमात्य यांचे साजगिरिडे श १६१२ (इ १६९१) चे वेळीं असून औरंगजेबाच्या धुमाकुळीमुळें ओसाड व नाकाद पडलेल्या ह्या परगण्यांतील शेतसारा दुनर्का द्यावा असें अमात्य देशमुखाना सांगत आहेत ही गोष्ट लक्ष्य आहे ह्यापुढें हिंदुराव घोरपडे यांकडे व नंतर प्रतिनिधि व त्यानंतर उदाजी चव्हाण ह्यांचेकडे हा प्रांत आला स ३ ले ४५३ पृ ४१६ वर 'मग महाराजानी बाबा मत्रा याजकडील जिल्हा त्यांजकडून काढून त्यान्या वगैरे परतवून बदोबस्त करण्यासाठीं, राव प्रतिनिधीस जिल्हा मागितला असें आलें आहे. येथें हा गोष्ट लक्ष्यांत घ्यावयाची की, ह्या वेळीं श्रीनिवास परशुराम हे प्रतिनिधी असून मुद्रा परशुराम त्र्यंबकांचाहि त्यानीं उपयोगांत आणिली आहे (ले ३१, ३२ पहा). ज्या पत्रावर अशी मुद्रा आहे त्या पत्राची समाप्ति 'परवानगी हुजूर' या शेऱ्याची आहे अशा मुद्रा व शेरे ह्यांचेसबधानें स्वतन्त्र लिहिण्याजोगें आहे सामान्यत ही बाब उलट्या न सारख्या शास्त्रार्थातील दिसते असो ह्या कागदांत ले ३५ मध्यें येसाजी भोसले ह्यांचें पत्र आलें असून तो शाहू छ०स काका म्हणून सबोधीत आहे. हा येसाजी थोरले शिवाजी महाराज यांचे चुलत आजे व मालोजी राजाचे सख्खे धाकटे बधु जे विठोजीराजे त्यांच्या घराण्यातील त्यांच्यापासून पांचवा पुरुष ( विठोजी-नागोजी रावजी-लक्ष्मोजी येसाजी ) होय ह्याच येसाजीस विठोजी म्हणून मुलगा होता व तो धाकट्या राजा राम छ०नीं दत्तक घेऊन (धाकटे) शाहू आबासाहेब हें नांव ठविलें असत आणखीहि कांहीं नवीन माहिता ह्या कागदांत आहे विस्तारभयास्तव येथेंच थाबून पसर्णीच्या पालिकरांच्या कागदांतील कांहीं नवीन वृत्त पाहू

पसर्णीकर पालकरांच्या कागदांत नेताजी पालकर ह्यास हा गांव मुकासा होता, नेताजीच्या मुलाची गोतपत म्हणजे त्यास शुद्धकरून परत हिंदुधर्मांत घेतले पालकास पालिकरांच्या विभागणीबद्दल सर्वदिवस साडास टाकून फार्सी देण्यापर्यंत आलेली पाळी, रणदुल्लाखानाच्या कारकिर्दीतील कांहीं गोष्टी इ इ माहिती आहे पैकीं नेताजीच्या मुलाच्या गोतपतीसबधाची गोष्ट नवीन आहे. नेताजीची सुता केली म्हणजे त्यास यवन केलें; पण श १५९८ आषाढ वद्य ४ थीस (१६७६ जून १९) त्यास प्रायश्चित्त देऊन शुद्ध केलें (जे श ); तसेंच शिवाजी राजांनी गायकवाडांकडील (हे बीरवाडीकर देशमुख अधिकारी मौजे महाड) सरकार वाईच्या पेशवी आलली कन्या कमळजाबाई ही जानोजी पालकरास दिली असें जें अभ्यास आलें आहे तें येथें लक्ष्यांत घेण्याजोगें आहे

राजमाता जिजाबाई ह्यांचे नांवें जिजापूर ही पेठ नवी वसविली ह्यासबधीचे कागद ले ५१–५६ हेंहि येथें नवीनच प्रसिद्ध होऊन अभिनव भर घालीत आहेत सं वर्ष १ अ २ पृ. ७८ वर ह्यासबधीं टीपेंत ओझरता उल्लेख आला आहे पण आज हे त्यासबधींचीं मूळ व पूर्ण विश्वसनीय पत्रेंच प्रसिद्ध होत आहेत पूर किंवा पुरा वाडी, पेठ अशा नांवानें त्यावेळीं होणाऱ्या गांवठाणाच्या वाढीविषयींहि लिहिण्याजोगें आहे व त्यांतीलच पाषाण गांवची बाजारपेठ म्ह० ' जिजापूर ' होय शि च सा ख. ६ ले. २५ मध्यें मालोजी, शेलोजी, परसोजी, विठोजी ह्यांच्या नावानें मालपुरा, शेलपुरा, परसपुरा, विठपुरा ह्या पेठा असल्याचें सांगितलें आहे. शेड ला जोडून असलेलें शिवाजीचे नांवचें ' शिवापूर ' त्यांतीलच होय

१ शिवाजीराजांनीं देवालयाच्या मशिदी झालेल्या पाडून तेथें पूर्ववत् मंदिरें उभारलीं ह्यासंबधींचा मूळ उल्लेखहि येथेंच प्रथम प्रसिद्ध होत आहे शिवाजी राजांनी मुसलमानी परराज्य घालवून तेथें स्वसत्ता स्थापिली म्हणजे काय काय केलें त्यांत हीहि गोष्ट राज्यव्यवहार कोशाप्रमाणें येते

ह्याप्रमाणें शिवाजीकालीन, राजारामकालीन सामाजिक, धार्मिक व राज्यकारभारविषयक, जमीन-धार्मिसबधानें नव्या व जुन्याच्याहि पाठपुरा करणाऱ्या बऱ्याच गोष्टी ह्या खडांत आल्या आहेत शिवकालीनहि कित्येक गोष्टींचा विचार करणें राहिला आहे. पण झाला हाच विस्तार अधिक झाला असल्यामुळें येथें एकदम थांबणें भाग आहे.

भाद्र व १८६४ } शंकर नारायण धत्तजोशी

## शिव-चरित्र-साहित्य खंड ८

# अनुक्रमणिका

# विषय सूची



[ ह्या शि च सा स ८ मध्यें जीं ऐ पत्रें इत्यादि छापलीं त्यांमधून सामान्यत ज्या विषयासंबधानें उल्लेख आले आहेत त्यांची अकारादि क्रमानें यादी पुढें दिली आहे ]

# शिवचरित्रसाहित्य खंड ८

## १ नाणे मावळांतील तर्फ गरवडचें देशकुलकर्ण
## श. १५६७

लेखक- य रा गुप्ते, बी ए, एम् आर ए एस्, पुणें ५
सेवानिवृत्त रिजिस्ट्रेशन इन्स्पेक्टर

प्रस्तुत[1] खुर्दखताची नकल माझे मित्र श्री गणपतराव आंबडेकर यांनीं मला दिली ती एलिनिएशन दप्तरांतील आहे पण तींत नेहमींप्रमाणें दप्तरांतील कांहीं टायपिंग चुका आहेत शिवाय बऱ्याच गांवांच्या नांवांच्याहि चुका आहेत त्या सर्व पादटीपांत इतर शिवकालीन कागदांवरून व गांवांची चौकशी करून मीं दुरुस्त केल्या आहेत श्री आंबडेकरांच्या घराण्याचा उल्लेख निदान शिवकालाइतका प्राचीन असून त्यांच्या एका पूर्वजाचा मानप्रभु बिन बाळप्रभु याचा या खुर्दखतांत नामनिर्देश आहे तसेंच माहादो अनंत पोफळे देशकुलकर्णी ता। गरवड ता। मा।र याचें नांव आलेलें आहे या दो ही घराण्यांतील पुरुषांनीं आपले संग्रहांतील जुने कागद आणून दिल्यास मावळांतील शिवकालीन इतिहासांत चांगलीच भर पडणार आहे

| | |
|---|---|
| ले १<br>मू दा प | श १५६७<br>इ १६४५ |

शिका नकल नकल

श्री

पारसी लिहिणे वळी सुमार १४

सीका असे

आजरदखान* सोहायेखान+ आगम महमदखान काजी सैद दामदौलत हु ता। कारकुनानी हाल व इस्ताकबाल व आधिकारियानि व देसायानी व मोकदमानी

---

१ पा स १३।६३ * अज रख्नखाने + सोदायवद दामदौलतहू = असडि लक्ष्मी अलकृत असो

तो। नाणे मावळ सरकार लोहो§ चिदानद नि* हारची सुहुरसन सीत आर्बैन आलफ् ( ) हरिविली× भान प्रभु बिन बाळ प्रभु व माहोदो अनत पोफळे देशकुळकर्णी ता। गरवड ता। मार हरदोजण ता। मजकूरचे देशकुळर्णी+ याबद भाडत हुजूर आले ( ) यावरी हुजुरून हजीर मजालसीस फरमाविले जे (ः–) हारदो जणाचे वरहाक† मनसुबी[] कर्णे ( ) यावर समस्त हजीर मज्यालसीस= बैसोन हरदोजणाचे नीवाडा केला धीतपसील (–)

| ता। भान प्रभु बिन बाळ प्रभु | | ता। माहादो आनंत पाफळे[१] | |
|---|---|---|---|
| गावगना २० | | गावगना २० | |
| १ मौजे नाणे | १ मौजे बेलज | १ मौजे निगडे | १ मौजे माऊ |
| १ मौजे गोवीत्री | १ मौजे वलवली[४] | १ मोजे फलणे | १ मौजे टाकवे बु॥ |
| १ मौजे वळवसर[२] | १ मौजे तारणे[५] | १ मौजे मरूळ[७] | १ मोजे राजपुरी |
| १ मौजे नेसा(व)रे | १ मौजे बुधवडी | १ मौजे वाउड | १ मौजे घोणसेत |
| १ मौजे वळक | १ मौजे जावचली | १ मौजे साई | १ मोजे सीधे |
| १ मौजे कोंडिवडे | १ मौजे करजगाव | १ मौजे नाणोली | १ मौजे कावरे |
| १ मौजे आवडे बु॥ | १ मोजे यहवली | १ मोजे सांडसी | १ मौजे मुढावे |
| १ मौजे घलवती | १ मौजे तमसवाडी[६] | १ मौजे सावसेन | १ मौजे टाक्वे खु॥ |
| १ मौजे वडिवली[३] | १ मौजे पासडी | १ मौजे सवकेवडा | १ मौजे सिरसवते |
| १ मौजे उक्साण | १ मौजे उबरे खुर्द | १ मौजे वारवे | १ मौजे धोरण[९] |
| १० | १० | १० | १० |

सदरहु गावचे हक लाजिमा[८] भान प्रभूने मौजे सोगसे ईसापती आधिकारी

सदर गावचे हक लाजिमा मा( )होदो अनत घेणे

---

§ नाणे मावळ सरकार जुन्नर खाली आहे लोहो हें कांहीं लक्ष्यांत येत नाहीं * नि × हरिविला = यावेळीं + थ गळला आहे † न्यायानें [] मनसुबी= न्याय = मजालस ः मजालीस = दर्बार, सभा १ पोफळे २ "वळवंडे" हवें ३ "उढेवाडा" ४ "धलवती" पाहिजे ५ तारणे = तोरणे ६ "ताकसवाडी" पाहिजे ७ "मगरूळ" हवें ८ लाजमा = कर ९ मानतामतांत मोने ह्या शब्दाचा टाइप आम्ही मोग टेरिला आहे.

सणाचा गाव आसे सदर्हु गावची हक मान मभूने घेणें इनाम मोजे पाले आहे ते मान प्र () भूने खाणे कुलयाच कुलकानू

इसापती मोजे वेल्हवली मान प्रभूनी खाणे

नाण्याचा बाजार पेठ सुा तेथील सेव एक हक निमे मान (प्र)भूनी खाणें

जात्रा वेहरचा हक लाजीमा व सेव निमे मान प्रभूनी खाणे

पान मान व हरयेक मान वडीलपणा बदल मानप्रभूस दिधले असे मानप्रभूनें खाणे

तसरीफ दिवाणातून येईल ते आर्धी महादो* अनत घेणे निमे मान प्रभूस देणे

मार्गी दर गोणीस विश्वा रुका आहे पो ता मज () कुरचे कुळकर्णी पास पैका आहे तो माहोदो अनत सारा खाणे

मुसादाणाचा मुशाहिरा टके २१ तो मोहोदो आनत सारा खाणे

नाण्याचा बाजार सुा पेठचे तेथील सेव निमे माहोदो आनत घेणें

जात्रा वेहरचा हाक ला () जिमा सेव मा () हादो अनत निमे खाणे.

तसरीफ+ दिवाणांतुन येईल ते माहादो आनत आर्धी घेणे निमे मान-प्रभूस देणे

सदरहु निवाडा बरहुकुम कतबा प्रमाणें करुन हुजूरुन महजर हजीर मजालसी करून दीधला असे आणि हरदोजण नफरासी† महालास पाठविले आसे () तरी येणें प्रो माहाली महजर करून देणें () येणेच प्रमाणे आवलीयाद+ व आफलाद‡ खाणे () तुम्ही तालिस लिहून घेऊन आसल सुदसत कुळकर्णी मजकुरास परतोन दीजे आणि हरदो कुळकर्णी याचे सदरहु प्रमाणे निवाडा जाहालेवर आपले सुद् निसबती याचे मलरून खुसीने शेरणी होन १००। कबूल करुन कतबे दिल्हे असे बिा

| | |
|---|---|
| मान प्रभु बिन बाळ प्रभु होन | माहादो आनत पाफळ होन |
| ——— ५०। | ——— ५०। |

* महादो=महादेव

+ तसरीफ = सरकारांतून आलेले सत्कार

† नफर = व्यक्ति

+ औलाद = पुत्राची प्रजा

‡ अफ्लाद = मुलीची प्रजा

§ सुदसत = सुर्दसत

असे दुमाला*उगवणी करून सदरहु पाठविले+ () मोर्तब सुध्ध () मा (मो) र्तब असे

सुदसत चजीरु (?) माहादो अनत पाफळे

( नक्कल करणाराचे वगैरे शेरे गाळले आहेत )

---

# २ ( नगर ) शेवगांवचें एक शिवकालीन मिरासपत्र

( ले - य रा गुप्ते, बी ए, एम् आर ए एस, पुणे ५ )

खालील मिरासपत्र माझे मित्र के शिवरामपंत भारदे, शिक्षक अहमदनगर मिशन शाळा, यांनीं दिलें हें नगर जिल्ह्यांतील शेवगांवच्या एका घराचें मिरासपत्र आहे[1] शेवगांव त्यावेळींहि कसब्याचें ठिकाण होतें मानजी आहदेव शेवगांव कसब्याचा कुळकर्णी होता मानजी नांव पुष्कळ वेळां येतें पण आहदेव अथवा आवदेव क्वचितच येतें 'ह' व 'व' जवळ जवळ सारखाच काढिलेला आहे " ल, भ, तु, फ व सह्यांतील 'स' " हीं या दस्तऐवजांतील विशिष्ट अक्षरें होत[2]

| | |
|---|---|
| ले २<br>मू दा १ | श १५९७ आश्विन व ७<br>इ १६७५ आक्टो १ |

सके १५९७ राहेस सवदसरे आसोंन वदी सप्तमी त दिसी ताजमहमद वासि देऊजी पिन मेगोजी चुधवत कसबे सेवगों सन १०८५ तारक राजी होऊन लेहून दिधलें जें तुम्हांपासुन रुपये १५० । मा। दोंडसें घेऊन घर व वाडा कसबे इमल तुम्हास मिरासी करून दिधला असे () तुम्हीं लेकराचें लेकरी इमारती करून नांदणें() जेल बिा मानजी आवदेव कुलकर्णी कसबे मा।

---

* दुमाला + 'हुजूर पाग्र्शि' असें असावें

१ शेवगांवीं सबरजिस्टर असतां फारसींतील अवरंगजेबाच्या सुंदर अक्षरांत लिहिलेल्या दोन मोठ्या सनदा माझ्या पाहण्यांत आल्या ( इ स १९१६ ). त्या तेथील कार्जीनीं मला आणून दाखविल्या कोणीं त्या सनदा मिळवून प्रसिद्ध कराव्या २ पा स ११।६१

गोही ( : )

महमद मु(-)
राध वलद
बचू पा(-)
नसारा
बसामाजी व(-)
लद परसो(-)
वा भंडारी
बंधाजी रिकर

स्यायाजी वलद
चादमिया
पानसारे
देवाजी सराफ
का सेवगाऊ
येमाजी उलथक

बाजी वल(-)
द सबाजी
गंगाजी वल(-)
द सादू दर्जी
बयाजी पान(-)
सार

( फारसी
मुद्रा )
आऊजी वल(-)
द बसाजी धर्जी
पीलाजी
वानी

---

[ गोही म्ह. साक्षीदारांत फक्त शेवटची सही "पीलाजी वानी" ही बालबोधींत असून बाकीच्या मोडींत आहेत

प्रस्तुत मिरासपत्रांत, पुणें व सातारा या जिल्ह्यांतील दस्तऐवजांहून बाल-बोध अक्षरांचा भरणा जास्त आहे

श्री. भारदे यांनीं खरेदी केलेल्या बाड्यांत कांहीं महत्वाचे कागद-गाद्यां-संबधाचे-मिळाले होते. तथापि पुढें ते प्रसिद्ध करण्यांत आले किंवा नाहीं हें मला माहीत नाहीं ]

---

## ३ शक १४२१-२२ तील दोन पत्रें

( पे शि ला. आतार )

श्री

ले ३
मु न

श १४२१ माघ शुद्ध १
इ १५०० जाने. २

नकल

यासि साक्ष पत्र प्रमाणें

लागो पाटाल
गगा सेटी कुमगाऊडा

गाग सेट पटेल
गुड सेटि तम सेटी

( मागील बाजू )

चाग सेटी
गोगौडा
चागा लोहार
कृष्ण भट बान
पलिभट गुलवणी पत्र
साक्ष प्रमाणे

नागसेटी
तासगौड
देवा सुतार

सोई सेटी
मोन सेटी
राम गुडा
माळो सोनार

तम सेटी
ताळी सेटी
ईम्हेमा कुभार
देवा नाहवी

सपोर्टे
वाच्यालभट
धुदुळ भट*

रोनेभट बान कृष्णभट
नारायेण भट
तिकभट सोडगाडा
व्यानकर थयणभट

---

ले ४
मू न

श्री

श १४२२ वैशास शु ५
इ १५०० एप्रिल ३

श्री सावेश्वर जयेति माह धरि
क्ष स्थान युगानयुग महामा कृ
ष्णा तीर नियास स्थान

नक्कल

*स्वस्तिश्री नृप शालावा शक १४२२ वर्से रौद्रा नाम सवछरे वैशास ५ सोमवार तदिना कसबें पालवें मजकूर कमलाइ बाँन पाटल भट तिने अपला नात

लेकीचा लेक कुकू भवास[1] चौवर्णाची उपाध्यायपणाचि वृति रुस्णार्पण रुस्णार्पण दील्ही असे वा मदन कलस पुजा चालविजे तुझा गोत्रजास समध नांहि अमचे कन्या सतान रामेश्वर भट सिरटाकराचा पुत्र कुकूभवाचा वश चालवाजे चेद्र सुर्य तप तों चाल धाजे निरजावे जाणाजे सुसि आसाजे

यासि साक्ष पत्रप्रमाण

| | |
|---|---|
| नागो पटेल | कुलकर्णी भिवोपा |
| मधव गौडा | धाडो सलोपत |
| बार मुगडा गधारी | सगोपत समडोलाकर |
| हपोजे सोनार | रवलसेन गोसावा |
| रवसेन साईगुडा | हमला सलसेनी |
| रवलसेन साइगुडा | पुरस सेना |
| सोमसेन थोरला | बारकटला थोरला |
| मादशा | दागर |
| सुतार जोस | |
| कुभार नागो | |
| नाहवी बमल | |
| परीट गांगा | |

---

# ४ शक १४५४ मधील मिरासी वृत्तीचें दानपत्र

(ले–श्री द वि आपटे)

१ येथें दिलेली नक्कल रा द बा पोतदार यांच्या सग्रहांतली आहे ती अगदी अलीकडची म्हणज १२५।१५० वर्षांपुर्वीची असावी नक्कल करतांना शब्दांची रूपें बदलून आधुनिक केली आहेत यामुळें शक १४५४ मधील मराठी भाषा पाहण्याच्या दृष्टीनें हा कागद उपयोगी ठरत नाहीं.

---

[ मागील पानावरून पुढें चालू ]

धरून मिती पाहू गेल्यास शुद्ध व वद्य पक्षांमधील सप्तमी व चतुर्दशी येते पाचाचा आंकडा दुसऱ्या प्रकारें काढतात, तो दोन किंवा नऊ असेल. येथें नऊ धरल्यासहि अष्टमीचा क्षय किंवा अष्टमीसह नवमी मानिली तर शुद्ध पक्ष मानतां येइल पण हें सारें मानण्याजोगे आहे. सध्या वार सोडून शुद्धपक्ष मानून मिति गृहीत धरली आहे.

श ना जोशी

२ पण आंतील मजकूर म्हणजे भावार्थ खरा आहे असें धरल्यास यांत एक गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आढळते. ती अशी कीं, गणोजी व विठोजी गिधये हे दिवे व सोनोरी या दोन गावचे जोशी व कुलकर्णी असून त्यांनीं वृधापकाल झाला म्हणून काशीस जाऊन देहाचें सार्थक करण्याचे ठरविलें तेव्हां गावकऱ्यांनीं व मो कदमांनीं वृत्तीची वाट काय असा प्रश्न केला, व तुमचे गुरुकुल पानसी आहेत त्यांच्या हातावर वृत्तीचें दानोदक सोडण्याबद्दल सुचविलें त्याप्रमाणें त्या दोघांनीं लक्ष्मीधर पानशाच्या हातावर उदक सोडलें; अशी या पत्रांत हकीकत आहे. यावरून म्हातारपणीं वृत्तीच्या लोभापेक्षां काशीयात्रेची म्हणजे धर्मविषयक आस्था या गिधयांच्या मनांत अधीक जोरदार ठरली, व वृत्तीचें दान देतांना कांहीं पैसे मोबदला न घेतां केवळ धर्मबुद्धीनें चार लोकांसमक्ष लक्ष्मीधर भटाच्या हातावर पाणी सोडल्यानें होऊं शकलें असें क्वचितच उदाहरण आढळतें पण मुख्य गोष्ट कीं, वृत्ती ही खासगी मालमत्ता असून तिचा कसाही विल्हेवाट करण्यास मालक पूर्ण स्वतंत्र होता, असें दिसतें

ले ५ }
मू दा १ }

{श १४५४ श्रावण शु ३
{इ १५३२ जुलै ५

*श्री

नक्कल ३

घर मन्नास करणे त्यावरून हे गोष्ट आपणास मनली त्यावरून हे दानपत्र 'तुम्हांस लेहून दिल्हे असे तुमचे पाये धुवोन तीर्थ घेऊन तुमचे हातावर पाणी दोही गावचे मिरासीचे जोसपण व कुलकर्णपणाचे घातले असे तुम्ही लेकराचे लेकरी मिरास खाणें आपला कोणी आवलाद व आफलाद तुम्हांस वृतीविसाइ सलेल करील त्यास पचमाहा पातक असे वृती तुम्हास दिल्ही असे दुसरे पानसी यास गरज नाही हे लेहून दिल्हे सही छिा ७॰ आवल पत्री वोली सुमार २५

गोही

मौजे दिवे क्यात सासवड
१ गण पा मोकदम निा नागर
१ मेगोजा चौगुला
१ चिवाजी भापकर
१ मांब माली गिरेकर
―
४

मौजे सोनोरी ता करपठार प्रां पुणे
१ बाळ पा बिन काल पा मोकदम निा नागर
१ मावजी बिन वर्तमान (!) बाल पा मोकदम
३ कुळवाडी
१ सिवजी गाडवे
१ रामजी सोनवणी
१ आचाजी काम
―
३
८ बलुते मौजे मार व मौजे दिवे
१ पिल सुनार
२ जानु बाली बरा
१ माउ धरणा हद
१ रामा वारक मोरा

---

[ मागील पानावरून पुढें चालू ]

त्यांचे उपाध्ये, म्हणून गिधवियांनी आपला मूळ पुरुष लक्ष्मीधरभटपणजा त्यासी पाय धुवून दान दिल्हें " असें असल्याचें सांगितलें तें मूळ दानपत्र उपलब्ध नव्हतें तें हें वर दिलें आहे म्हणजे पानशी यांजसबंधीं मिळालेल्या ऐ कागदपत्रांत श १५०० च्याहि पूर्वीचें ५० वर्षांचें हें पत्र आहे. हा हा पत्राचा एक विशेष आणि 'वतन पत्रांत ' उल्लेखिलेलें जें पत्र तेंच हें हा दुसरा विशेष निराळा विशेष म्हणतां येईल पिशुन शब्दाच्या अर्थाचा येथें पिशुन म्हणजे 'आश्रित, आप्त,' 'दुष्ट, चहाडखोर' नव्हे. किंवा 'पिशुन' हें वाचन त्या शब्दाचें नसावें — श ना जोशी

१ संता चांभार
२ माहार जाना गायेकवाड
सोनवणी व राणा

८

# ४ ओझरचा शक १५०३ मधील शिलालेख

( ले–पां मा चांदोरकर )

पुणें जिल्ह्यांत जुन्नरहून आग्नेयेस तीन कोसांवर कुकडी नदीचे कांठीं 'गणपतीचें' ओझर म्हणून एक इनामी गांव आहे येथील गणपतीचें मंदीर पुणें येथील प्रसिद्ध मुजुमदार घराण्याचे पूर्वज अन्याबा मुजुमदार यांनीं बांधिलें असें सांगतात हें अष्ट विनायकांपैकीं एक आहे. तेथें नदीकांठीं त्यांची म्हणून एक समाधीहि दाखविली जाते या गणपती संस्थानची वहिवाट चिंचवडकर देव घराण्यांतील एका शाखेकडे आहे. त्या शाखेजवळ जुन्या कागदपत्रांचा बराच भरणा आहे. येथून ओतूरकडे जातांना पाव कोसावर रस्त्याच्या डाव्या बाजूस पश्चिमेस एक जुनी पायविहिर आहे. त्या विहिरींत हा शिलालेख आहे त्या ठिकाणीं पूर्वाभिमुख भिंतींत मोठ्या खालीं ही लेखशिला बसविलेली आहे. तिची लांबी ४५, उंची १६ अंगुळें बाजूस व मधोमध २४ आहे. देवनाग सारखा शिळेचा आकार आहे, म्हणजे वर महिरप व खालीं हंपचौकोन. लेखाच्या एकंदर ओळी पांच असून अक्षरें उठावदार

हीहि टीन सत्कार्मिच आहे. अशी रूपें व प्रयोग आणि शुद्धलेखन ज्या भागवत टीकेन असेल तीच टीका एकनाथाची निखाळ समजावी हें लेखन सोळाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत होतें असें संताजीच्या तुकारामकृत अभंगाच्या लेखनावरून सहज ध्यानात येईल.

*नेउ हरदेउ ही कोण व्यक्ती त्याचा बोध झाला नाहीं.*

बिहिरीला 'गरुडबिहीर' म्हणतां येईल अशी कांहीं खूण—म्हणजे गरुडाची एखादी मूर्ती वगैरे—तेथें आढळली नाहीं मात्र, बिहिरींत अगदीं तळाशीं एक, ज्यावर चित्रें सादर्ली आहेत असा ( गणेगाळ्यासारखा ), दगड वरून दिसतो तळाशीं जातां येण्या सारखा मार्ग नसल्यानें खालीं जाऊन पहातां आलें नाहीं शक्य येथें कीं, त्या वर हि एखादा लेख असावा, परंतु, तो जमिनींत पुरला गेला आहे व वर जेवढा म्हणून भाग दिसतो त्या वर लेख वगैरे कांहीं नाहीं शक १५०३ ला वृष संवत्सर आहे लेखात वार दिलेला नाहीं, असता तर लेखाच्या प्रामाण्यास गमक म्हणून उपयोगी पडला असता।

---

# ५ तपे काटीचे देशमूख

(शं ना जोशी)

*सोनतर्ची दोन पत्रें सोलापूर येथील म्यु स्कूलमास्तर रा बाजीराव यशवंतराव देशमुख यांजकडून मिळाली सदर पत्रांचा काल श १५१५ व श १५७४ असा आहे. पत्रांतील विषय देशमुखी व जमीनयाचे संबंधी आहे हा वर्षी २ ऱ्या बुऱ्हाण निजामशहा ( १५९१-९५ ) ची कारकीर्द चालू आहे

पत्रात तीन मोकासदार अधिकाऱ्यांची नांवें क्रमानें आलीं आहेत 'सभाजी उपरी जसवंतरायासी मुकासा जाला' त्याच्याच पुढें 'साहेबासी सालगुदस्ता मुकासा जाला' म्हणजे माहालदारखां हा मुकासदार झाला म्हणजे १ सभाजी, २ जसवतराव, आणि ३ महाल्दारखांन अशा तीन मोकासदारांची नांवें क्रमानें आलीं पण मध्यतरीं 'सुर्दसत सभाजी जसवतराऊ सुा सन इहदे' असा एक उल्लेख आहे म्हणजे सभाजी जसवतराऊ असा जोड निर्देश करून त्याच्याचपुढें दिलेल्या वर्षाचा आंकडा एकच दिला आहे. सभाजी व नंतर जसवंत हे जर दोन स्वतंत्र आहेत तर येथें एकत्र उल्लेख कसा असा संशय येईल पण पत्रांत जसवनरायानें आपलें सुर्दसत न देतां सभाजीच्याच सुर्दसतावरून वतन इनाम चालविलें असें आल्यामुळें हा एकत्र व एका वर्षाचा उल्लेख आला असावा असें मानतां येईल

---

* पा स १५५

पेसारू व निरखू आणि आनप व न्याहालपेठ इ. जकातीचे प्रकार मेरत-कांत आलेले ह्या कागदांत आले आहेत. ह्याविषयीं माहिती प्रस्तावनेंत पहावी

ले. ७ }
मू. दाप. }

{ श. १५१५
{ इ. १५९३

*बंदे दरगाह
दाउद महलदारखान
(फारसी अष्टकोनी शिक्का)

(शिक्यातील मजकूर)

अजरख्तखाने खुदावंदखाने अजम माहालदारखां खुलीदयाम दौलत हू बजा-नीबु कारकुनानी हाल व इस्तकबाल व देसमुखानी तपे काटी चिदानंद सुा सन अर्बा तिसैन व तिसा मैया नरसजी देसमूख तपे काटी हुजूर मालूम केलें जें आपणासि इनाम भोगवटा कारकीर्दी दर कारकीर्दी चालिला आहे

मौजे देगावी निरखु* जमीन सेते कसबा अनप* मार्ग तुलजापूर न्याहाल* पेड ३
व पेसारु* दर गोणीस व कर्याती ७ पुसी पुनिवेचा दिस
अडका ८॥०

१ आवा
१ चिंच
१ भोकरी
३

येकुनु चितपसील

बाा खुर्दसत सभाजी जसवंतराऊ सुा
सन इस्दे छ १० सावान

कसबे काटी सेते चारी ४ कर्याती सेते तीन ३
येक विरेचे सेत येक १ पाठस्थळ सेत मौजे म्हैसले चौ
देसील बाग कीर्दीकर्दे नामाजी
दहिवडी सेत येक १ नेसकर+ १ सेत १
अनसाई सेत १

मौजे नरसेड सेत कीर्दीकर्दे भोमाजी कोलयाल सेत १
मौजे सावरगौड कीर्दीकर्दे चागोवा कुलकर्णी सेत बाा नंदसरणी १

जपानी देसमूख सालाबाद चालिले आहे म्हणउनु न करिरे व रजू मा।

१ श १५१२ ज्येष्ठ शु १२ = इ. १५९० जून ४. + कंसाची भाग.
* करशिोच. ह्याविषयीं प्रस्तावना पहा

मार्गे तुळजापूर पुसी पुनिवेचे दिवसीचा अनप | मौजे देगोऊ निकालु व पैसारु दर गोणीस अडका ८॥

न्याहा[ळ] पेड दर सवाद् का॥ मा॥ मलियात

आबा येक चिंचा येक मोकरी येक

१ १ १

ये रीती कारकीर्दी दर कारकीर्दी भोगवटा व तसरुफाती माजी कारकीर्दीच भोगवटे फितरतीकरिता गेले सभाजी उपरी जसवंतरायासी मुकासा जाला तेणे सभाजी त्याच खुर्दखतावरुनु चाळविले आपले खुर्दखत दिधले नाही साल॥* त्याचे बागावर्द होउनु साहेबासी मुकासा अर्जानी जाला हुजरु उनु खुर्दखत घेतले नाही महाली कारकुनी इनाम दुबाले केला सालमजकुराकारणे खुर्दखताचा उजूर करिताती खुर्दखत होये मालुम जाले वर मालुमाती नरसजी मा॥ सदरहू इनाम सेतें सात ७ व मार्गे तुळजापूर अनप पुसी पुनिवेचा दीस व देगावी निकालु व पैसारु दर गोणीस अडका व न्याहाळ पेड तिनी कारकीर्दी दर कारकीर्दी चालिले असेल ते तसरुफाती व भोगवटे सेहिन करुन तेणेप्रमाणे चालविजे सभाजीच्या भोगवट्या आधील भोगवटे गेले त्याचा व जसवंतरायाच्या भोगवटियाचा उजूर न कीजे तसरुफाती बरवे रीती सेहल करुनु तेणेप्रमाणे चालो दीजे दरहरसाल खुर्दखताचा उजूर न कीजे तालिक घेउनु असलि इनामदार मजकुरापासी फिराउनु दीजे सालगुदस्ता हुजुरीचे खुर्दखत नसोनु इनाम दुबाले केला आहे त्याची तसवीस नेदीजे ( फारसी मोर्तब )[1]

---

ले ८
मु दा प

शक १५७४ माघ शु॥ ९
इ १६५३ जाने २७ सोमवार

( माथी १७ ओळी फारसी मजकूर )

बजानेब कारकुनानी तपे काटी समत जाफराबाद शुहूर सन सलास खमसेन आलफ विद्यानंद के दरीविला नरसजी देशमुख तपे मजकूर याने मालुम केले की आपणासी इनामबदी तपसील

| | | |
|---|---|---|
| मौजे सकरगाऊ देह १ | सेते ७ | |
| | कसबा | कर्याती |
| | ४ | ३ |

---

* श १५१४ = इ १५९२

१ कागदास ५ जोड असून जोडावर फारसी मोर्तब आहे. व तो कागदावर पाठीमागे नाही. पुढेंच आहे.

यासी तपसील बाबवार

कुलबाब कुलकानु देसील माहसुल वा नख्तयाती व बाजे बाबा तमाम दुबाले

मौजे सकरगाऊ सेते दर सवाद

देह १ कसबे मा। सेते ४

निसारी* देसील माहसूल सेरीज नख्तयाती व बाजे बाब सेते दर सवाद कर्याती ३

१ सावरगाऊ
१ नरखेड
१ म्हैसले चौधरी

३

येणेप्रमाणे इनाम आपणा[स] सालाबाद भोगवटा तागाईत साल गुदस्ता व बा। खुर्दखत मोकासाईयानी माजी कारकीर्दी दर कारकीर्दी चालिले असे साल मजकुरी तपे मजकूर साहेबासी मोकासा आर्जानी जाहले वरी माहली कारकून ताजा खुर्दखताचे ऊजूर करिताती दरीनाब नजर आनायेत करून सदरहू इनामतीस सालाबाद प्रमाणे दुबाले खुर्दखत मरहामत करावया साहेब हाकीम असेती म्हणून तरी बराये मालुमाती नुसातीर मुबारकेसी अणू सदरहू इनामतीस ताजा खुर्दखत मरहामत केले असे माहली देसाई मजकुरासी इनाम बा बी।

मौजे शंकर गाऊ सेते ७

४ कसबा
३ कर्याती

यासी तपसील बाबवार—

कुलबाब कुलकानु देसील माहसूल वा नख्तयाती व बाजे बाबा तमाम दुबाला

मौजे शंकरगाऊ सेते दर सवाद

१ कसबे मा। ४

निसारी* देसील माहसूल सेरीज नख्तयाती व बाजे बाब सेते दर सवाद कर्याती ३

१ मौजे सावरगाऊ
१ मौजे नरखेड
१ मौजे म्हैसले चौधरी

येणे प्रमाणे इनाम सालाबाद भोगवटा ता। साल गुदस्ता चालिले असेल या तेणे प्रमाणे बा। खुर्दखत मोकासाइयानी माजी कारकीर्दी दर कारकीर्दीचे असेल ते रुजू पाहून त्याचे तालिक लिहून घेऊनु सालमजकुरासी सदरहू इनाम देशमूरत माचे दुबाले कीजे दरहर साला ताजा खुर्दखताचे ऊजूर न करिता हेची मिसेली करून सालमसाल चालवीजे तालिक लिहून घेऊनु असल मिसाल परतून दीजे मो। पा। हुजूर ( रुप सुरुंली का मो )

* ओवाळणी

तेरीख ७ माहे रबिलोवल

पौ छ ११ माहे माहे रबिलोवल = (श १५७४ माघ शु १३)
(इ १६५३ जाने ३१)

---

# ६ हुकेरी परगण्याचे देशपांडे

(श्री शं ना जोशी)

ह्या देशपांडे घराण्यांत विभुते, पंडित, देशकुलकर्णी हीं उपनावें आहेत ह्यांचा हुकेरी नतर सिदरापूरास व मलिकवाड येथेंहि वाडा होता ह्याचीं उप घराणीं कागशी मुतनाळ, सांवगांव, निलजी, मिरज जमखडी कचूर इतक्या ठिकाणीं आहेत मिरज व जमखडी येथील घराण्यांचा असवया एका शाखेपासुन फाग असें नेमकें आढळलें नाहीं

हे मुदईनूर ( रायचूर निजाम स ता कुसगी ) गांवचे मूळचे हुकेरी जमखडी मिरज व मुदेहाळ हे ४ परगणे हुरकडलगी मायण्णा विभुते ह्यान्या मुलाीं मिळविले ह माहिती कळते ही अथात् फारच त्रोटक व सांगाव आहे ह्याहून आधिक व विश्वसनीय अशी भरीव माहिती माधार पुढें यावयास हवी

प्रस्तुतचे कागद प्रो चद्रशेखर धुडिराज देशपांडे धारवाड कॉ ह्यांचे वडाल के चाव्यासाहेब–हे हु डे कलेक्टर होते – ह्यांच्या सपहांतील श्री रघुत्तमाचार्य जहागिरदार– भूयार यांजकडवीं मिळालें त्यांचा साभार निर्देश करणें आद्य कर्तव्य आहे.

ह्यांतील ले. ९, ११, १२ १३ १४ १५ हे सर्वांशीं अप्रमाण नाहींत एक तर ते नक्कल आहेत ले १५ तर फेरिस्तवजा म्हणजे कागदांचा यादी असून तींत स माधवराव कालापर्यंतची नोंद आहे. पण ह्या सर्व लेखांकांतील व्यक्तिनामें सर्वांशीं युक्त म्हणजे त्यांचा काल, हुद्दा व धदा म्हणजेच कामगिरा ह्यांसह भत्यतर पुराव्यानेंहि खरो बर आहेत म्हणून लेखांतील देशपांडे ह्यांजविषयीचा माहिता लक्षांत घेण्यास हरकत नाहीं नकलेंत लेखकानें कांहीं कमी अधिक केलें असावें पण तेंहि अगदीं खोटें नाहीं

हे देशपांडे घराणें पूर्वी व सांप्रतहि चागलें प्रतिष्ठित व प्रसिद्ध आणि ज्ञानी असें आहे. ह्यांजकडे ऐ कागदांचा सग्रहहि मोठा आहे. तो सर्व पाहण्यास मिळून त्यांतील कांहीं निवडक भाग ग्रथरूपानें प्रसिद्ध झाल्यास तो त्या घराण्याच्या व एकदर इतिहासाच्या फार उपयोगी पडेल अशा आहे की लवकर कांहीं घडून येईल

---

पा स २१५७

ले. ६ } { श. १५५१
मु. दा. प. } { इ. १६२९

( मोहोर फारसी ) नकल

पारसी हरप पारसी हरप पारसी हरप

( मोहोर पारसी )

पारसी हरप

*मुसतयारयानी रुयवर्देय फते मेहेर हजरत अले अला हु ताला पातशाहेहिलि-*
याद आमालत हमाहन पोसत हा हुसनमान दरतगाह मकर्द मुरतफ काजी मीर मोहमुद बसीर कचेरी सरकार विजापुर हजेरत हुसरुम बमोजीव कौलनामा बनाम तमाजी नाईक देसाई व आलमगोडा देसाई व तिमाजी मंडत देसकुलकर्णी परगणे हुकेरी बिता सुर मन १०३९ सलासीन आलफ दरीविला तुम्ही या पराणियाचे फर्जंद कदीम दौलतखोहा पादशाही कामास रास्त व दुरस्त रानदौन साहेब कामावरी हलाल तुमचे वडेवडे सर्फराज जाहले आहेत हाल तुम्ही हुकेरी इलाइतीचे गांव गैरदस्त होऊन वेचिरास पडल होत त्यासी तुम्ही पटेल कुलकर्णी व रयेत लोकास दिल्ह दिलासा देऊन गांवची वस्ती करून काटवणाती जंगलझाडी तोडऊन कौर्दी माहामोरी करून गांवची लावणी संचणी करून इलाइती सरकार जमावंदीचे दाम १ माफ केल सरकार किफायतीस कमतरी केले नाही तुम्ही जमेदार फर्जंद विडीजादे दौलतखोहा साहेब कामावरी यकीन जाणोन तुम्हावरी मेहरबान होऊन हुकेरी इलाइतीचा कारभार तुमचे दुमाला केला असे तरी सदरहू इलाइतीचा खंड बेरीज न्हन ८०००० ऐसी हजार पादशाई कर्यात देहाये गावगना जमाबंदी मुकरर बेरीज ठराऊन दिल्हा कर्यातो चितपशील

| | |
|---|---|
| २३२२ कसबे हुकेरी | ८८०० सो मनोली |
| १०० पेठ गजपूर | २०६० तपे कबूर |
| ७७५६ ता मजती | ६०१३ तपे जुगुल |
| ३२४६ ता नेमरी | ४६६६ तपे सावगाव |
| ४१८७ ता कापुसघोल | ३७७२ तपे आलत |
| ३०२४ ता जेन | १०५६ तपे सावळज |
| १६६६ ता कटे | २७२० तपे दुधगांव |
| १०६६६ ता सोलापूर | ४४६६ तपे जुगल |
| ५९८० का सदलग | ३३०५३ |
| ४६१४७ | |

+ जमाबंदी बेरीज ८०००० पादेशाई येसी हजार मुा ठराऊन दिल्हे आस इसयदी अवल + अखर सालातलग देत जाण कौल्खडा बेरीज जाजती तौसीस तगादा होणार नाही हे आसल जमा + गीर रामोन पिढी दर पिढी पादशाई हिला हिलीचा कारभार करून खुशाल असणे + तुमचे वतनावाबत (1) परगणा मजकुर कर्याती देहाये गांवगना हिनाम जमीन चावरान व उमली देह व गावगना + ल्वाजिमा पनी पछोडी व तैनात व पालसी तैनात व मुल्यासनी कानुसडणी छे रा सण + कि ला ख त प स र हि द व बेडकी निसब व सवरी खर्च व पैदास्त दाम व जिनसाना खरिदी मोल्त व थेटी वेगारीयां व फसक्रीशा व रोयेन तरकारी व फर्मासी कानुनात व सरड दाम नदीतीरा हसील व चावर फर्मास व आरोडिया व रानता घेडा व नखल पन्ले व कुलकर्णी याचे वतन वगैरे कुलबाब कुलकानु तुमचा तुम्हाकडे मरामत करून दिल्हे आसे नरी अवलाद अकलादे खाऊन पादशाई कामावरी रुजवात व भाचेन करम आसोन आसले दौलतखोई जाहीर करणे तुमचे इनाम चावरान व उमली देह व हक ल्वाजिमा वगैरे यासी जुडी इनामवगी व सरकार बावनी व सडणी वगैरा हर बाब माफ केला असे याविसा तौसीस होणार नाहा हर कोणी इदु अगर मुसलमान हरसन हिम कौल करतील तरा त्याचे महजबचे बुरी सौगंद आस नरीस फारसी हरफ मोर्तब फारसी मोर्तब फारसी हरफ

---

ले. १० } श्री { श १५९२
मुदाप } { इ १६७०

राजाधिराज राजमान्य राजश्री मुधो तिमाजी देजीव जमा चौ(रि)काय गोसावी यासी

॥ छ सेवेसी प्रती लक्षमण गौडा देसाई परगणे हुकेरी मुरु सन इहिदे सबैन अलफ सरण सरणार्थी विनती उपरी मामले हुबली सपगावांचे सरदेसाई याचे पेशवाई तुमचे जायर्तने घोडो चलावासी ठेविले असे पेशवाईचे मुशाहिरे होन १२५ ~~ व हवालगी नफर बरगीर घोडा दो सासदार पानसुपारी तुम्हास हरसाल होन ७५ ~~ घोडो चलाल करवी आम्ही देऊन याविसी आम्हा धणी असो जे वेळेसी तुम्हास पावे ना ते वेळेस + + असा पेशवाई चाल्वणे अगर मुनालीर ठेवणे या करवी सरदेसाई चालऊन घेतील याविसी आम्ही धणी असो जाणिजे हे विनंती

(फा. मो पुरकोणी शिर्का)

(डाव्या हातावडील कागदाच्या मोकळ्या समासात नांगराचा ठसा-आहे) ५

(३) ... ( ) ...
शिवच स ८-३

ले ११ }
मू द्रा प }

[ हा सब मजकूर स्मरणानें व बऱ्याच कालानंतर लिहिलेला दिसतो मजकुरा-वरून तर तसें वाटतच, विशेषत ऱ्रागद शाइ व लेखन ह्यवरून निश्चित वाटतें आणि ह्यामुळें मजकुरांतील कालनिर्देश अतिशयोक दिसतात पण मजकुरांतील मुख्य भाग सामान्यत वास्तव आहे व तो कसा हें पुढील लेखावरून कळून येइल ]

माहाराज- सिवाजीराजे छत्रपती स्वामी यांनी पा मारच्या खडर्णीच्या रुपये कीर्ता सिदगौडा देसाई व मुरारराव त्रिमल देशकुलकर्णी यांस राहिरीगडास नेऊन आदवखाना ठेविले + + ( तेथें ) तीन वर्षे श्रम भोगीले उपरा मुरारीराव त्रिमल यालेस राहून सिदगौडा दसाइ यांस पा मार + वसुलास पाठविले सिदगौडा [देसा] इ यानी रुपये पाठविले नाहीं यामुळे मुरारराव त्रिमल यानी आणीक दोन वर्षे श्रम सायास सोधून माहाराजाची दया संपादून पा मारचा इजारा चार हजार होनास खड करून देसाईयाचे व आपले नांवें करून वर्षे व पालखी व बकसासें ५ उमली गावें व इनाम व हकदक करून घेऊन पा मारास आले उभयेता देसाइ व आपण रुपये सरकारचे देऊन कारभार करीत आले इनामें व उमलीगांवें व हक्कदक उभयता देसाई यांस व आपणास व गांवकरास कारकीर्द आवरंगजेब व माहाराज———छत्रपती यांचे वेळेस चालून हिन्दी तागायीं चालतात———कलम १

---

ले १२ {
मू द्रा प {

{ श १५९६ श्रावण शु १२
{ इ १६७४ आगष्ट ३

श्री

( शिवाजी राजांचा मुद्रा अष्टकोना )

( फारण्यांत गेली असावी ) नागरू जलाले पत्रावरून शोध करून लिहिले आहेत

अभयपत्र

स्वस्तिश्री नृप [१]शक १५९५ शक आनंदनाम सवत्सरे श्रावण शद्ध द्वितीया

---

१ हा शकाचा आंकडा शकाकं देण्याऱ्या वर्तमान व गत ह्या ज्या दोन पद्धती यांतील, दुसऱ्या पद्धतीचा म्हणता यइल म्हणजे आनंद सवत्सरास शक १५९६ हा पाहिजे व तो धरीला तरी पत्रांत दिलेल्या तिथींनिहि दुरुस्ती करावी लागत आहे. म्हणजे द्वितीयेच्या जागीं द्वादशी धरल्यानें पत्रांतील सोमवार हा वार येतो व मग सर्व कालोलेख गणितशद्ध होइल पण श १५९६ हाच ( आनंदसवत्सर ह्या सवत्सर नांवाऱ्या आधाराशिवाय ) कां धरावा तर्सेच द्वितियेची द्वादशाहि ( इदुवारास

हदुवासरे क्षेत्रियेकुलावतंस श्रीराजा शीवछत्रपती याणी राजं + श्री सिदगौंड दसाइ व मुरारीराव निमल देसकुलकर्णा पा हुकेरी यासी दिल्हे अभयपत्र ऐसे जे तुम्हास सन सलास सबैनामध्ये स्वारीत रो॰ [1]प्रतापराऊ मर सरनोबत यानी कैद करून हुजूर किले रायेगडास कितेक दिवस ठेविल हाते मग तुम्हाविसीं रो॰ रघुनाथपंत कोरडे हेजीब व हिरोजी इदलकर सुभेदार इमारती किले मजकूर यानी साहेबासी विनती केली का देसाइ व देसकुलकर्णी मार थोर वतनदार परमुलकीचे बहुत दिवस कैदेमध्ये श्रमतात यावरी दयालु होऊन मसलहत करून विलायेतीस + दा॥ खड करून सर्फराजी करून सोडिता आपले मुलकास जाऊन पैसे उधल करून साहेबासी रुजवात होऊन येकनिष्ठेने वर्तताल म्हणौ विनतीस चित देऊन तुम्हावरी मेहेरबान होऊन विलायेत दे॥ वतनदारास खड[3] होन पा २०००० वास हजार करार करून यासी मुदती अेक साला करून सदरहू ऐवज हिरोजी इदलकर सुभेदार किले मारास नेमिले + निमे तुम्ही वतनदार व निमे विलायेती पैसे तह करून तुम्हास सर्फराजी सिंव्हासना बेसते समई वस्त्रे व पसलिसे उभयेतास दिल्ही बिता

श्री शिवराजे
हपनिधान
[1]निमल सुत मोरेश्वर
मुख्य प्रधान

रत सासा दर ये

| | | |
|---|---|---|
| कांस पच | ऐनू | पालसी दे॥ |
| न समगे १० | | |
| किरपा दो | | |
| (?)दे रुमाल २ | | |
| अबदगिरी | | निशान तगगा उतार |
| सासा १ | | सासा २ |
| + की | | कर्ने नगारे |
| | | २ २ |

येणे प्रा तुम्हास + + + + मुल्कास आज्ञा देऊन पाठविले आहे आपले मुलकास जाऊन सद्दरहू + + मुदती खिस्ती केल्या आहेत तेणे प्रो, खुद निसवती + + + उसल देऊन साहेब कामासी येकनिष्ट रुजुवात असणे तुमचे मुलकात लस्कर स्वारीस येईल सरदारांची भेटी घेऊन अभयपत्र दाखवणे तुमचे अगर तुमचे मुल्कांचे वाटे जाणार नाहीत लस्कर मुले स्वारी शिकारी घेऊन कोणी काही उसुल धामधुमेत घेतील ते हिसेब हुजूर येऊन रुजू करणे सडात मुजरा देऊ तुम्ही शेर अदेश न धरिता खातिरजमा असोन साहेबकाम करीत जाणे तुम्हास तसवीस तगाद लागों देणार नाही याविसी अभये असे हे अभये पत्र सही दर साल सन समस सबैन अलफ छ १० जमादिलेवल लेखन अलंकरण मर्यादेय

विराजते

नारो निलकंठ
मजमदार

| | |
|---|---|
| सुरु अणाजी दत्तो सुरुनिवीस खासा | थार दकर राहूजी सोमनाथ द्या मजमु रुजु दकर |
| असल दस्तुर + + (बालाजी) अऊजी प्रभु चिटनिवीस | तश्रिफा ता उभयेता गावोले १<br>लखम गोंडा देसकुलकर्णी<br>देसाई २ २ मोरदार<br>१ मदील २ दुपटे<br>१ चादर पेटणी<br>२ ४ |
| असल सोदगौंडा देसाई व मुरोराम कुलकर्णी मौजे रडेहेनाल काठा खुलियां बा। हुकेरीस गो। लखणगोंडा व तिमाजी विश्वनाथ (या) जवली पाठविली लखगोडा विलायेतीस ता। उभयेता + + + येणेप्रा हुकेरी + + + ता देसाई | कौल सद्दरहू प्रा पाठविले आहेत हनवानी दस्ती वाडगौडा + दिवी सिरमा १<br>सनगे ७ गावोले १ |

*येणे प्रा तुम्हावर रुपाळू होऊन दरो बाचा कौल देऊन माहालास पा असे तर आपले मुल्कास जाऊन सद्दरहू खडाचे पेवकमी मुदल केली असे तेणे प्रा साल दर साल वसूल देऊन वशपरपर हुकेरी विलायेतीचा कारभार करून कुली साहेबा कामावर रुजुवात असणे आणि तुम्हास सर्फराजी बा। इनाम + गावगना व हक (२१३ अक्षरें फाटली) *पुत्रपौत्रादी वंशपरंपरा आनभऊन वतनी सेवा करून* सुखरूप राहणे सद्दरहू वतन तुमचे वश पर (४५ अक्षरें फाटली) मन करून दिल्हे असे या वतनास तुमचे भाऊबंद बारिसदार देखील तक्षिमेस समध नाही तुमचे वतन (तु) म्ही वशपरपरा भोग्य करीत जाणे याशी कोणी आमान्य करील त्यास त्याचे पूर्वजाची व

* पा स २४५६

गोवाळगाची शरत असे दिल्हे दरी बाबा कौल इनाम पत्र सही दर साल सन समस- सबैन अल्फ लेखनालंकरण मोर्तब

नारो निळकंठ मजमदार

बार दफ्तर रावजी सोम

नाथ दिा हुजूर दफ्तर मजमु

मुद्र अण्णाजी दत्तो

सुरनिवीस बार

दस्तुर बाळाजी आवजी चिटनिवीस

---

ले ११ }<br>
मू दा प }

श्री

{ श १५९६ श्रावण शु १२<br>
{ इ १६७४ आगष्ट ३

सिक्का तालीक

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १ आनंदनाम संवछरे श्रावण शुा* २ इंदुवासरे (!) क्षेत्रायकुळावतंस श्री राजा शिवछत्रपती याणी चिरंजीव राजश्री मुरारीराव श्रीमल उपनाम विभूते गोत्र काश्यप सूत्र आश्वालायन देश कुलकर्णी पो हुकेरी जमा रिश्वाचा माहाल उमर मुल्की सरदेशपांडे प्रांत मजकूर यासी दिल्हे दरी बाबा कौल इनामपत्र ऐसा जे तुम्हास सन सलास सबैनामध्ये स्वामीने राजश्री प्रतापराव सर सर (नौबत) (२१० अक्षरे फाटली) याणी धरून आणिले कैद करून हुजूर किल्ले रायगडास कितेक दिवस आटकसाना ठेविल होते मग स्वामी सिंव्हासनी बैसता समई तुम्ही स्वामीसाठी बहुत सख्त मेहनत केली थोर पराक्रम करून स्वामाचे नशाजीस उतरला आणि तुम्हास रिसा गजे(श्री र)घुनाथपंत कोरडे हेजिब व हिरोजी इदलकर सुभेदार इमारती किल्ले मजकूर (याणी म) दुमीचा बहूत तारीफ केली त्यावरून (२१३ शब्द फाटलेत) स सेवक स्वामीकार्याचे जाणून तुम्हावर मेहेरबान होऊन येकंदर हुकेरी विलायेतीची कारभार कुली तुम्हास व तुमचे पुत्रपौत्र परपरा स्वाधीन केला असे तरी सद्रहू विलायतीस खड होन पादशाई २०००० वीस हजार करार ठराऊन दिल्हा पासी मुदती ीा स्वाती साल्यापासून अखेर स्वाती पावेतो येक साल पासी किस्ती स्वार दर सिरनीस होन पादशाई ५००० पांच हाजार प्रो मुदतीचे मुदतसि येकंदर यमूल माल दरसाल देत जाणे सडासेरीस ज्याजती तसवीस तगादा होणार नाही तुम्हास सफराजीबद्दल सिंव्हासनी बैसता समई तुमचे इनाम उमली देह व गावगना कमत जमा रिश्वाचा व अर्जी इनाम व कर्नूम इनाम व सर्फराजीबद्दल इनाम

---

* शुध द्वितीयेस इंदुवासर नाही शुक्रवार आहे व द्वादशीस इंदुवासर येतो ले १२ वरील तीनही गोष्टी ह्या लेखांकास लागू आहेत

व गावगना हक ल्यानिमा धगैर कुल बाब कुल कानू दुमाला करून वर्ते मशार दिल्ही असे कलमे बितपसील

इनाम उमली देह साडेआठ ता देहाये

मौजे हिवाड ऊर्फ मालिगवाड का सदलगे देह १

मौजे कमतनूर को मनोली देह १

मौजे चिक्कालगुड का मजती देह १

मौजे सुल्तानपूर का निंचोर देह १

मौजे कसनाळ का सदलगे देह १

मौजे लक्षणापूर का कट देह १

मौजे सुळगाव का सावगांव देह १

मौजे शेडूर का सोलापुर देह ॥

सरंजामीबदल इनाम मौजे बोर्कीर को जुगल देह १

बखे बखे पेडिस्त खासा नग ५ कलम १

अबदागीर खासा १ घोडा तुरकी बा मुा १

नगारा १

कणा १

पालखी बदल मुा उडत निशाण तगरी उतार किरग बा

हुदे रुमाल १

सिक्केबा रुपे ताले ३

मिर्दा नफर कलम १

यो इनाम उमली देह साडे आठ व बक्षीसेस कलम दाहा मन्हामत करून दिल्ही अमेत हद सुरु प्रांत भजकूरी देहाय गावगना इनाम जमीन कदीम इनाम ३८२८८२॥ व जमाखिचा इनाम १७८१५ व आर्जी इनाम ११। व सरंजामीबदल इनाम ५।१७ यो जमीन ३६८२॥ येकूण च्यालीस चावर आठीच पांड तपसील आलाहिदा मन्हामत करून दिल्हीं असे गावगना हक ल्याजमा दरशेकडा होन पादशाई ५ पाच व परी पछेडी १ व तैनात होन २॥ व पालखी तैनात होन २॥ व भेट होन १ व उल्फ होन ॥ व बीज गला दर चावरी कुडो १ व जकायेत बिस्ता दर गोणीस रुका ८१ येक व सोत पछोडी १ व साली कोष्टी याच मागास पछोडी १ व पान सालेस पाने रोजी १५० व तेलीयाच याचे[1] घाण्यास रोजाना तेल ८८। पावसेर व इनाम चावराना कुडो १ व दर गुराल्यास गुळ ढेप १ व बाजारास फसकी उकाळा व याना हासील व गुगल खड पैदास्त व नदी टोकरा हासील व रानता म्हार व चामारा कडुन फमास वगैरे कुल्बाबा कुल्कानू दुमाला केल असे यो भजकूरी कुलकर्णी याचे निगुनिक यनन तुमचे तुम्ही आनभवून येणे कलम १

येणे मां तुम्हारर रुजाकू होऊन दरीबाबा कौल देऊन माहालास पा। असे तर आपले मुलकास जाऊन सदाकू सडाचे पेकसी मुदत केली आहे तेणे मां साल

१ दुधार घेणें.

दरसाल देऊन वशपरपर हुकेरी विलायेतीचा कारभार करून कुली साहेब कामावर रुजुवात असणे आणि तुम्हास सर्फराजी या इनाम उमली देह साडे आठ व कदीम इनाम व जमारिकामा व आर्जी इनाम व सफराजा या इनाम गावगना व हक ( २ अक्षरे फाटली ) जमा वगैर कुलबाबा कुलकानू दुमाला करून वख्ते बक्षिसे देऊन हे इनामपत्र दिल्हे असे तरी सदरहू वतन तुम्ही तुमचे पुत्रपौत्रादि वशपरपरा आनभवून वतनी शेवा करून सुखरूप राहणे सदरहू वतन तुमचे पशपर ( परा मन्हा ) ( ४५ अक्षरें फाटलीं ) मन करून दिल्हे असे या वतनास तुमचे भाऊबंद वारसदार देशील तक्षिमेस समध नाही तुमचे वतन तुम्हा वशपरपरा भोग्य करीत जाणे यासी कोणी आमान्य करील त्यास त्याचे पूर्वजाची व गोब्राह्मणाची शपत असे दिल्हे दर्गी बाया कौल इनाम सही दरमाल सन खमस सबैन अल्फ लेखनालंकरण मोर्तब

| | |
|---|---|
| नारो निलकंट मजमदार | बार दप्तर गणजी सोम |
| मुरु आणाजी दतो | नाथ दिा हुजूर दसर मजमु |
| सुरनिरिस बार | दस्तुर बाळाजी आवजी चिरनिवीस |

---

ले १४ }
मू दा प }

श्री

{ श १६०० माघ शु १३
{ इ १६७९ जाने १४

स्वस्तिश्री राजाभिषेक शक ५ काल्युक्त सवछरे माघ सुध त्रयोदसी भौमवासरे क्षेत्राकुलावतंश राजा सिवछत्रपती यानी राजेश्री बाळाजी भास्कर देशाधिकारी व देसलेखक प्रांत आजिरे यासी आज्ञा केली ऐसा जे मुरारराउ मामल देसकुलकरणी पा हुकेरी व सांदगोरा पा हुकेरी खडिणी बदल हुजूर रायेगडी अट्(व)काना ठेविले होते *हाली मुरारिराऊ यासी गोपाल परसराम यासा पाछापुरीचे सुभा सागोन पाठविले आहे त्यानगवरी याला वस्त्र देऊन पाठविले आहे येसीयासी तुम्हाकडे विलायेतीच्या किती येक कर्याती आहे ती तुमी तेथील देसकुलकरणाचा कारभार याचे हाती घेत जाणे पूर्वी राजे स्वामी सेन्हासनि येमतें समई सिद्गोडासि व मुरारी रायासि व वतन दारास व विलायेतीस खड होन पादशाही २०००० वीस हजार करार करून यास वस्त्रे व बकसिसे व वतनदारासी वस्त्रे व विलायेतीस कौल दिल्हे होते व मुरारराबास बक्सीस दिल्हे होते बितपसील

| टिरल(१)बासा नग | पालखी मुस्तोंदी | आल्काबगिरी बा देसील | निशानतगरी |
|---|---|---|---|
| ५ | १ | १ | १ |

---

* ह्या उल्लेखावरून ले ११ मधील फारास दुजोरा मिळतो.

सिरेंच्या रुपे तोले फिरगी ( तीन चार अक्षरे फाटला ) हुदे रुमाल नगारा
१ ३ १
बांका घोडा तुरकी
१ १

येणे प्रमाणे पूर्वी रायेगड होऊन पेक(का) उसुल बदल मुरारीरायास व सिद्गोडाचे हैवासी हुजूर उल ठेऊन सिद्गोडास उसुलातास पाठविले ऱ्या५ वरिसे जाहाला पेसा पाठवून मुरारीरायास सोडविले नाही व साहेबासी येऊन भेटोन मागुती रुजुवात जाहला नाही व विनतीपत्रही लिहिले नाही मुरारीराऊ तरी वेक पावले म्हणतात सुभे मुभेसी पेके उसुल होऊन जमा जाहले आहे म्हणतात तरी तुम्हाकडे याचे निसबतीने व विलायेती निसबतीने काये उसूल जाहला आहे ते तहकीक साहेबासी कलावे आहे ते लिहून पाठवणे हुकेरी विलायेतीच्या स्याती तुमचे सुभेमध्ये आहती तेथील कुल देसकुलकर्णीचे कारभागस रचणा लावणी व खंडिणी दडिणा उसूल वासूल याचे उजागतीने येन जाणे या खेरीज याचे कोण्ही देसकुलकर्णी म्हणउन येताल त्यास दखलगिरी साहेबाखेरीज होऊ न देणे थावरी साहेबाची मेहेर घानी बहुत आहे स्वामीनिष्ठा पनाला स्वमुखे तुम्हास आज्ञा केली आहे पेसाजी यास घरगीस जे दिल्हे आहे ते आपले वतनावरी चालतील तुम्ही मदत होऊन चाल वणे कोण्ही हिला हरकत करतील त्यास तारीद करणे दसाल सु॥ सन तिसा सबेन लेमा अलैहार मर्यादेव विजयते

सुरसुद वार

सुभे
१ दायाजा भास्कर[१]
१ अनाजी सरदेउप कोल्हापूर
१ बाळाजी भास्कर अजिरे
१ गोपाळराऊ ( पंडित ! )
४

( केरिता )

( ह्या ४ सुभेदारांची नांवें एका कागदावर अशींच लिहिलेलीं आढळलीं )

१ शि च सा खंड ६ पृ ६९-७०

१ शिवाजीचा मुकाम पन्हाळा येथें ह्या वर्षी म. श १५६५ व १६७३ मार्गी होता शि च सा खं ८ १ पृ ११५, ग १८ पृ १६

ले १५ }
मू दा प }

{

यानें येडी यद्नाला पालेन मुलुक मड्णीबद्दल नेऊन वीस हजार होन पा
करार करून पाचा काम्भार वतन इनामगांव व जमातिशाय जमीन व आ + इनामे
उभयेता देसाइ यानों बक्सीसा पालखी वगैरे देऊन दुमाला करून दिल्हे त्यांस वर्षे
सन सीत सबैन १५९६ ता साले ११५ राजपत्र व रामचद्रपंत आमात्य यांचीं पत्र
व सरसुभेचीं व सुभेचीं व ( सेना ) पती व इत्यादिकांचा पत्रे व ताकिदें पत्रें आहेत व
मोगलाईतीलहि पत्र आहेत येकदर मोघम पत्रे व प्रथकहि आहेत

- १ मल्लिकवाडाविसीं श्रीमंतास नजर नजराणा देऊन सनद घेऊन ग +
- १ कमतनूर समंधे सनद मोगलाई सन इहिदे तिसैन आलफ यास वर्षे ९९ आलीकडे हि ताकाद आहे वर्षे ८० गावे त्यास आलिकडे कारकाडमुं चालला नाही श्रीमंतास विनती करून रामचद्र नाइकास विद्मान नज नजराणा देऊन + + चे आमलांत सनद लाऊन + ऊा घेतला
- १ मुरगावची सनद मोगलाइ व सिवशाही इहिदे तिसैन वर्षे ९९ चिकालगुड व लखणापूर व सुलतानपूर व योरें वगैरे ताकिदपत्रे आहेत

---

ले १६ }
मू दा प }

{ श १६११ आश्विन वद्य २
{ इ १६८९ सप्ट. २१

हु
( का गो
शि )

पुनः ते हक लिहिले आहेत ) मिलाकुसूर चालवणे दरी बाब तारीद असे छ १५ माहे जिल्हेज मो सूद फा मो.

( रुचवतुळ )

---

ले १७ }
मू दा प }
श्री
{ श १६१३ आषाढ शा ४
{ इ १६९१ जून १६

[ छ राजारामाचा जिंजीकडील प्रवास, लगेच त्याचा मोगल सैन्यानें केलेला पाठलाग आणि महाराष्ट्र सेनानी धनाजी सताजी ह्यांचा त्या सैन्याशीं झालेला सामना ह्यास अनुलक्षून पुढील पत्रांतील मजकूर आहे त्यावेळीं कर्नाटकांतील वतनदारांची स्थिति कशी होई त्याविषयीं मुख्यत हें पत्र उपयुक्त होणारें आहे ] राजेश्री देश कुलकर्णी व रयानी पा हुकेरी गोसावी यास

सेवक गोपाळराऊ कृतानेक नमस्कार सुा इसने तिसेन अलफ रा मुरारीराऊ देशकुलकर्णी पा मार यास वृतीमुळें + रगोंडा ( दसाई ) या नीज्याम जानशार सानाचा पाठविले असता तुम्ही हरकसी करून आदणा व सिद्याचे मक्लमोये व चार + यासि मिळोन याचे मुलालाऊ व मदती व चाकरां पाठऊन पैका व गला घेऊन त्या मध्यें तुम्हींहि तकसमीदार होऊन याचा मुले माणसे गावात राहू ने दाता नसती हिला-हरकती करू लागला यावरून तुमच काये मात्रा होता हे पातशाही फौजेचा अठनो महिने गत्रदिवस वस करून या प्रांताचे वतनदारामध्यें नामोश राखोन हव जानशार व त हदार सानाचा ह्याने [1]शाहाजादे या प्राती गद्गास आले त्याची भेटी घेऊन सिरोपाव व जान शारखानापाधुन सिरपाव व बक्सीस जमखाना फौजदारास व देसाइ यास तानिदी घेऊन येन असतां रा सेनापती व रा धनाजी जाधव व मानाजी मोरे व हबिरराऊ सेनासह वनमान या प्राती आले त्याची भेटी घेऊन मामलचे वर्तमान विदित केले त्यावरूनें नेही वरे देऊन मास आज्ञा देऊन पाठविले आहे तरी तुम्ही सिद्या व मरी हसमा वा आपाजी विरुपाक्ष + + याचे लोकापासून पैके व गला घेविला आहे व तुम्हीहि घेतला आहे तो देवत कागद सावर परतुन देवणे हे तुम्हास सुण्णार नाही तुम्ही हरगई केलीया तुमचे मुताल्यार माने वमतियांपासून मुदइ घेऊन धाने लागेल येसे समजणे लिहिलेप्रमाणे वर्तणूक करणे यानिशीं रा सेनापतीने देसाई व देमणा व आपाजी विरुपाक्ष यास लिहिले आहे + + याजी फौजदारास लिहिले तेणेप्रमाणे सुण्णार नाही जाणिजे रा छ २ माहे शावु हे[3] विनती ( मोत नसद अष्टकोणी )

+ पो छ माहे साबार बरावरी म +

---

१ तहमुरखान ? २ अनमशाहा ३ अक्षर वेगळें व उत्तम

+ शाइ व निमाण वेगळें

ले १८ } मू दा प } { श १६१५ ज्येष्ठ वद्य ११ { इ १६९३ जून २०

( फारसी मजकूर सात ओळी व शिक्का )
सन ३७ जुलूस आलमगीर

माार अनाम अबाजी पंडित गुमास्ते देसाई + हुकेरी मुहूर सन अर्बा तिसैन अल्फ + + आम्ही लस्करात असता वख तु मा + + + ही जाहीर जाहले होते त्या + + [1]अजमनगरास आ + + + दिवाण कामास की + + + नाही येसे यास हाली माार अनाम + (ग)याजी पंडित याम दिवानाचे नाइ + (ब) करऊन पाठविले असे यानीहि तुमचे + + (दौलतखो) हीचे मजकर जाहीर केले + तुम्ही बल नाइक + + खातीर जमा राखून + + कामावरी साबूत असोन + आपले तर्फने दौलत खोही जाहीर करणे यावरून तुमचे सरफराजी असे व तुमचे मतलब काही असेल तरी पंडित मशारनुले यास सागणे त्यानी जाहीर करतील त्या + + मतलब मवाफिक केले जाईल व कागद मिरिस्ता पा मजकूरचे हकिकत तुम्ही हुजूर येऊन मालुम केला नाहीत हे जमीदार + (का)ईदा नव्हे अता देखत कागद आपले गुमास्ते + कुल येसे हुजूर पाठविजे हुजरून + छ २५ माहे सौवाल

---

ले १९ } मू दा प } { श १६३९ पौष शु १२ { इ १७१८ जाने ३

जुबदे आमासील आनदराऊ गुा देसाइ लखमगौडा देसाई परगणे हुकेरी साा [1]अजमनगर व विद्रानद सुा मन सभान आशार मया अल्फ दरीविला सरकारचे स्वार जागाजागा कयात मजकुरा तहसील बदल ठेऊन आले होता त्यानी जागाजागा तहसील करून रसद जमा केली होती रुपये यमकनमर्डी रुा ६००० कबूर १००० लाा ५०० जुगल ५०० सदलगे ५०० बेनाड रुा ३०० येकन जुमला रुा ८८०० आठ हजार आठसे तहसील पैकी रसद इरसाल कराल म्हणोन राहा पाहिली आमा हुजूर जाहीर जाहाले का सदरहू पैकी तहसील जाहलेचे जुबदे आमासीले वरिचेवरी नेले याचा कायेम काये सरकारचे स्वार तहसील करून जमा करतील आणि जुबदे आमासील घेऊन इजाम कराल हे हेक आहे हाली देखत परवाना हो आठ हजार आठसे रसद इरसाल केल्या पेस्तर आपली सैर समजणे अगर दख्ल वस्ती केलियाी तहसील जाहाले पैकी येक रुका जुबदे आमासिलास पचणार नाही हे येकीन समजणे पेस्तर येसलासहि राहणार नाही बजनिस हे हकीकत तमाम हुजूर लिहिली जाते

---

[1] हे नाव अहमद अजमशहाने हि १०९८ म्ह. श १६०९ इ १६८७ मध्ये बेळगांवास दिले काव्ये स पृ २५

आसेर पेशमानी हासील होईल येकीन जाणोन बमोजिब हुकूम आमल करणे दरी बाब तालीद जाणिजे हाली रसदेबदल इभराइमखान स्वार पाठविले आहेत रसद सितावी हवाले करणे पेस्तरियास अठ हत्के केले होते त्या मिजुमले हत्के ५ गुजरले बाकी ३ हत्के बाकी राहिले आहेत जेणे बमोजीब करार केले आहे तेणे बमोजीब पैके तमाम साडा करून इरसाल करणे दरीबाब तालीद जाणिजे मोर्तब सुद तेरीख ११ माहे सफर सन ११३० ताजा कलम जागाजागा स्वाराम मसाला लिहून दिला आहे बमोजीब परवाने स्वाराचा मसाला आदा करणे उजूर न करणे जाणिजे मोर्तब सुद (फा दसखत)

पौ छ १५ सफर (पौष व २ = १७१८ जाने ७)

---

# ८ पुरंदरे घराण्याची एक शिवकालीन शाखा

(ले पां. न. पटवर्धन)

सासवड येथील पुरंधरे घराणें व त्याच्या शाखा पेशवेकालीन इतिहासांत पुढें आलेल्या दिसतात, परंतु नुकत्याच हातीं आलेल्या कांहीं लेखांवरून पुरंधरे घराणें शिवकालीं व शिवपूर्वकालीं पुणें प्रांतांत नांदत असल्याचें उघड होतें हें घराणें अद्याप पुण्यास विद्यमान आहे. पुरंधरे येथील या घराण्यांतील एका पुरुषास तुकाराम्या महणाचे मनगी मुगर जगदेव यांनीं अपहाराचा भाग दिला, तो अद्यापिहि चालू आहे. या घराण्याचा व सासवड येथील घराण्याचा संबंध दिसत येत नाहीं.

मौजे पिंपळे सौदागर चावर १ मौजे पिंपरी ना राहाण्णी १ मौजे परवती चावर १

या भोगाटे पेसर्जी सालाबाद तसरुफाती चालिले आहे व साहेबाचे खुर्द खत हि आहे हाली 'कारकून ताजा खुर्द उजूर करीताव साहेबी नजर ऐनात फमाऊनु खुा मल्हामती केले पाहिजे म्हणोउनु मालुम केले तरी खास इनाम सदर चावर ३ दर सवाद देहाये पा मा बा भोगवटे कारकिर्दी दर कारकीर्दी व खुा ईा पेसजी सालाबाद चालिलें असेला तेणेच प्रमाणे हाली तुम्ही हि चालवीजे दर हर साल ताजा खुर्द खताचा उजूर न कीजे तुम्ही ता ( लिक ) लेहोनु घेऊनु असेली खुा परतोनु दीजे मोर्तब सुद+

तेरीख ८

सौवाल*

सुरु सुद

---

+ अक्षरें निराळीं * पा स १०१४०

१ शि च सा स २ मध्यें श्री द वि आपटे यांना 'पुणें परंदरे घराणें म्हणून पृ १५०-१६० वर ते ११४ ते १२४ प्रकाशित केले त्यांत ह्याच महादभट अग्निहोत्री पुरंदरे यांना हीच ३ चाहूर भूमी दिल्याचा निर्देश आहे. महादेव भटास पिंपले सौदागर येथील एक चाहूर हा प्रथम व श १५४४ ( इ १६२२ ) मध्यें मिळाला त्यानंतर पिंपरी व पर्वती येथील २ चाहूर मिळाले. शहाजीस पुणें परगण्याचा मोकामा श १५५० ( इ १६२८ ) मध्यें मिळाला व त्यावर्षी शहाजीनें आपलें खुर्दखत महादभटास दिलें तेंहि तेथें छापलें आहे प्रस्तुतचें पत्रहि शहाजीचेंच आहे. आणि त्यांत 'साहेबाचें ( म्ह. शहाजीचें ) खुर्दखतहि आहे' असें स्पष्ट सांगितलें आहे. म्हणजे पुन कारकून शहाजीच्या ह्या पत्राची अपेक्षा धरितात ह्यावरून शहाजी आदिलशाही सोडून श. १५५० मध्यें निजामशाहींत आला तेव्हांचें तें वरील पत्र; आणि मध्यंतरीं म्हणजे श. १५५१ ५२ मध्यें तो मोगलाकडे गेला आणि पुनरपि निजामशाहीच्या उद्धारार्थ श १५५४ मध्यें निजामशाहीकडे आला अर्थात् मधल्या अंतरायामुळें हें पत्र कारकुनानी पुन मागितलें म्हणजे शहाजीचा हा 'शाही' बदल तसेंच जमाबंदी-दप्तर-व्यवस्था हीं लक्ष्यांत आणून देण्यास हें पत्र सहाय्यक होतें

शं ना जोशी

ले २१ }
मू दा. ५ }

{ श १५६९ कार्तिक व ३
{ इ १६४७ नव ५

Inam

A

Commission प्रतिपद्

( शिवाजीची अष्टकोनी मुद्रा )

*अज रख्तखाने राजश्री सीवाजि राजे दामदौलतहू बजानेबु कारकुनानी हाल
व इस्तकबाल व देशमुखानि पा। पुणा बिदानद सु॥ सबान अर्बैन
ख्वा अल्फ दरीविले महादभट बिन मुद्गलभट पुरधरे सो। कसबे पुणे हुजूर
सुद येऊनु मालुम केले जे आपणास इनाम जमीन चावर एक दर सवाद
मौजे परवती पा। मजकूर देखील नख्तयाती व बाजे बाब व पायपोसी
व पटी पो हाली व पेस्तर व— पटी व महसूल कुलबाब कुलकानु चावर एक गज शरायेनी सालाबाद मा। फर्मान बह सिक्के खास० खुर्दखत मा+ मदार मलिक अंबर——
——वजीरानी कारकीर्दी दर कारकीर्दी व सु॥ महाराज साहेब ता। सालगु॥ चालत आले आहे हाली मा। दादाजी कोंडदेऊ सुभेदार त्यास देवा+ जाली म्हणौनु महाली कारकून ताज्या खुर्द खताचा उजूर करिताती व मौजे मजकूर राम ठाकुरास मुकासा आहे तो सदरहू इनामास इस्कील करीत होता म्हणौनु आपण सन आर्बामधे महाराज साहेबास मालूम करून खुर्दखत आणिले आहे जे कदीम इनाम सदरहू आहे तो सेगीन करून मुकासा दिल्हे आहे ऐसे असोनु हाली आपले इनामतीची सेते खास रुके ८८ ता। गडेरायाचे सेत खास रुके ८६ वड सेत खास रुके ८२ येणेप्रमाणे आहे ते सेत देत नाही मुबादला आणिक देतो ते आपली सेते आपणास देविली पाहिजेती म्हणौनु मालुम केले बिता बरा इल्तमेस खातिरेसि आणुनु महादभट बिन मुद्गलभट पुरधरे कस मा। यासि इनाम जमीन चावर एक गज शरायेनी दर सवाद मौजे परवती पा। मा। देखील सदरहू याचे वर हुकुम फर्मान व भोगवटे वजिरानी व सु॥ महाराजसाहेब भोगवटे व नसरफाती भाास आणुनु ता। सालगु॥

* ह्याच वर्षीचे व शिवाजीराजांचेंच पत्र महादभटांना दिलेलें ले १२० व १२१ मध्यें ( शि च सा ग २ ) आलें आहे. ले. १२० मध्यें इनामतीच्या सेताचा निर्देश जो ले १२१ मध्यें आहे तो सोडून, आलेल्या मजकुराप्रमाणें हें पत्र आहे. ह्यांत त्याच सेताचा उल्लेख असून, ' मौजे पर्वती हा गांव राम ठाकुरास मुकासा आहे, आणि मोगें मुकासा इनाम सेगीन आहे, ' ही स्पष्टता प्रस्तुत पत्रांत आहे —

दां नो जोशी

+ समस्त्रत मदार

सन सबा चालिले असेली तेणे प्रमाणे चालवणे मुकासाइ इस्कील करितो त्यास इस्कील करू ने दणे सदरहु इनामाचा कदम सेत व सडेगाऊ कास रुके ८८ आहे ते च सेत याधे दुमाले करणे चावर एक भोजून देणे दर हर साल ताज्या तुर्द सताचा उजूर न करणे तालीक घेऊनु असेली इनामदारापासी फिराऊनु दणे सदरहू इनाम सेरीज करून मुकासाइ यास मुकासा दिल्हा आहे इस्कील करू ने दणे + मोनघ सुद (मर्यादेयविराजते)

रुजू सुरनवीस
तेरीख १७ माहे सौवाल*
सौवाल

सुरु सुद

---

ले. २२ }   श्री   { श १६१६ वैशाख व ११
मू दा ५ }     { इ १६९४ मे ९

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २० भाव संवत्सरे वैशाख बहुल एकादसी सौम्य वासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी समस्त राजकार्य धुरधर विश्वास निधि राजमान्य राजश्री रामचद्र पंडित अमात्य हुकमतपन्हा यासी आज्ञा केला ऐसीं जे वेदमूर्ती रंगनाथभट सुत खनाजी मलकरे व महादेवभट बिन सिरभट मलकरे वेद्य चजाचे मुकामी येऊन विदित केले की मौजे नागरगाऊ ऊर्फ तुळापूर कर्यात साडस प्रांत पुणे हा गाऊ पूर्वी मुरारी जगदेऊ येहा सुर्यग्रहणी तुळापुरुष केला ते समयी मौजे मजकूर समस्त ब्राह्मणास दान देऊन नागरगाऊ होते ते तुळापूर नाव टेविले आणि दान पत्र करून दिधले त्या प्रमाणे विज्यापूरचे पादशाहाचे पत्र करून दिधले होतें त्या उपरी माहाराज शाहाजी राजे यास देश हस्तगत जाला त्याणींहि ब्राह्मण समुदाये देखून आपले पत्र करून देऊन ब्राह्मणास सर्वमान्य चाल विले त्या अलीकडे राजश्री कैलासवासी स्वामी याणी मौजे मारी सेल वैल म्हणोऊन रानु सानी तहि ब्राह्मणास कृष्णापण देऊन पत्र करून दिल्हे तेणेप्रमाणे भोगवटा चालत आला त्यावरी औरंगशहा मौजे तुळापुरास आला होता तेव्हां ब्राह्मण समुदा याना पत्रे नेऊन दाखविली त्याउपरी त्याणी सर्वमान्य चालविले सांप्रत तो देश स्वामीस हस्तगत जाला आहे ऐशास स्वामी देवब्राह्मणाची स्थापना करून जीर्णोधार

फगिनातीं आपणास तो साल गु।। पावेतो भोगवटा चालत आला आहे तरी स्वामींनी कृपाळु होऊन पुढें उत्तरोत्तर चालवायाची आज्ञा केली पाहिजे म्हणोन वेदमूर्तीनी विनंती केली व महाराज राजश्री शाहाजी राजे यांचे व राजश्री कैलासवासी स्वामी यांचीं पत्रें आणून दाखविली तीं स्वामींनी मनास आणून सर्वमान्य चालवायाची आज्ञा करुन हे पत्र तुम्हास सादर केले असे तरी तुम्ही मौजे मजकूर ब्राह्मणास सवमान्य पूर्वीपासून चालत आले आहे तेणे प्रमाणे पुढेहि उत्तरोत्तर सर्वमान्य चालऊन ब्राह्मण सुखरूप राहत ते करणे +जाणिजे बहुत लिहिणे तरी तुम्ही मुज्ञ असा मर्या देय वि राजते

बार

## १ वाळवे-देशकुळकर्णी अभयपत्र श. १५५२

(ले-द वि आपटे)

ले २३ } { श १५५२ आश्विन
{ इ १६३० आक्टो

( शिक्का आहे लागत नाहीं अष्टकोणी )

[1]कौलनामे अज दिवाण तपे वाल्वे साहेब सदर ता।नागोजी तानदेउ देस कुल्कर्णी तपे मजकूर सु।। सन इहिदे सलासीन कारणे दादे कौलनामा ऐसा जे तानो[2] मेगदेऊ देसकुल्कर्णी तप मजकर चालविता होता +दरीवख [3]माहादो बलाल चाल . . .विलायेतीचे गैरराजी होउनु बाहीर . .. चे धलासी गेले मग

१ हा कागद रा दत्तापत पोतदार यांचे संग्रहातला आहे पा स २।४१

२ ह्या देशकुळकर्णादि वतनदारांवर कशा आपत्ति येत व त्यांचें निरसन कोठें व कसें होइ हें पाहण्यानें त्या त्या वतनासंबधींची माहिती कळून येणारी आहे प्रस्तुतचें अभयपत्र ज्या वाळवे तप्यास्या देशकुलकर्ण्यांना दिलेलें आहे त्याच दे कु संबधीं शि च सा ख ४ ले ७१५, शि च प्र पृ १०८ इत्यादींतील उल्लेख पाहण्याजोगे आहेत त्यावरून ह्या आपलेक देशकुलकर्ण्यावर आलेले प्रसग लक्ष्यांत घेऊन वतनदारी त्यांचा प्रांत व त्यावरील सत्ता इ गोष्टी ध्यानांत घेताल

+ मध्यतरी ३ हा वाळव्याकडीलच देशकुलकर्णी शि च प्र पृ १०९ धरून विजापूरचा धारण्याचा संभव -श ना जोशी

समजावीस करिता माहादो बलालासी नेयो म्हणोन बोलिले मग थळे विद्माने वा यगाय इलतमेस देसमुख ता मजकूर देसकुलकरणाचे कारबार मुळे............ केले आसे अपले हक लार्जीमा इनामपत्री पछोडी खाउनु दिवाण क [ मा ] ई करून सुखी असांजे कोणे बाबे ता आंदेशा न कीजे बिस्लम

तेरीख माहे रबिलावल

---

# १० सिराळकर निकम देसाई

## ( श्री पा मा चांदोरकर )

[ +हे कागद सातारा जिल्ह्यातील बत्तीस शिराळे या गावांतील निकम देशमुख यांजकडील असून ते श्री वा दा मुडले यांजकडून आले ]

ले २४ } { श १५६७ भाद्र शु ७ , इ १६४५ आगस्ट १८

अज रस्तखान सोदायवद खान अलिशान खान आफजलखान महमदशाई खुली दामदौलत हु बजानेब कारकुनानी हाल व इस्तकबाल प्रो सिराले बिदानद सुहुर सीत आर्बैन आलफ दरीविला बाजी देवजी देसाई मा मार हुजूर मालूम केले जे आपणासी मा मारी इनाम व तैनाति बितपर्सील

इनाम जमीन

| | |
|---|---|
| रकम टके १२९ | चावर १ |
| दर सवाद मौजे खेड | दर सवाद मौजे सुरूल |
| रकम टके ७५ | रकम टके ५० |
| दर सवाद सिवणी | दर सवाद मौजे नरसीपूर |
| रकम ४ टके | चावर येक १ |

इनाम व तैनाती दर माहाल जकात

मा मजकूर

---

+पा स ७४१
शिवच स ८-५

सालीना मुशाहिरे
दिवटे मा होन ६
छप्या होन १२
घेऊण होन आठरा १८

रोजीना
द(म)ती
५०० पाने
८०॥८ सुपारी
०।३ तेल जावनी
दिवटी

इनाम मोघदला चातर
मौजे कापुस खेडे ?? १५१
येणेप्रमाणे इनाम व तैनाती कारकीर्दी दर कारकीर्द मोकासाईयाणे माजी भोगवटे चालिले आहे हाली मो माा× साहेबासी मोकासा आर्जानी जाला आहे साहेबी नजर इनायत फरमाऊन सदरहु इनाम व तैनाती दुमाला फरमावया रजा होय म्हणोनु तरी बराये मालुमाती देसाई प्रांत मार सातारीयी आणोन सदरहु इनाम व तैनाती दुमाला केले आहे मरहुकुम भोगवटा कारकीर्दी दर कारकीर्दी मोकासाई या + + + कसे चालले आहे तेणेप्रो हाली दुमाला कीजे दर साला खुर्दखताचे उजुर न कीजे तालीक लिहून घेऊन आसल खुर्दखत परतोन दीजे + + + + मोर्तब सुद

रुजू सुरनवीस

तेरीख ६ माहे रजब

सुरु सुद
पौ छ १९ माहे शाबान (श १५६७ आश्विन व ६ इ. १६४५ सप्टेंबर ३०)

---

ले २५

शके १५९० श्रावण वद्य ७
इ १६६८ आगष्ट १८

गोल शिक्का*

[ फारशी ९ ओळी व अष्टकोणी शिक्का* ]

[ फारशी ४ ओळी ]

अज दिवाण जवत पा सिराले ता मोकदमानी मौजे विरले पा मजकुर चिदानंद के सुहूर सन तिसा सितैन आलफ बर हुकुम खुर्दखत रख्तखाना छ १५[1] माहे मोहरम पौ छ २ माहे [2]सफर सादीर जाहाले तेथे रजा जे दर्गावला तुराजी

---

× खानाचा हा अमल येथें प्रथमच दर्शित होत आहे * फारसी शिक्का अस्पष्ट
१ श १५९० अ आषाढ वद्य २ = इ १६६८ जून १६. २. आषाढ शु ३ = जुलै २

पार्गो देसाई प्रा मजकुर याचे हरि साबाजी देसकुलकर्णी हुजुर इलतमास बहुल (व)नाने केले वरी देसाई मजकुरासी सरफराज करून अजरा मन्हामत इनाम मौजे पा। मजकुर देसीत महसूल नख्दपानी व वेठबेगारी व पायपोसी मेज पानी फर्मो व गौड सेल घेल व जगपनी व भेटी ठाणा व भेटी हुजुर व लोणभेटी व बेठ बेगार व फर्माई समाकूल याच कुल उजुहाती मरहामत करून दिल्हे असे दुवाला करणे चि द नू द अवग्गाद व अहकाद चालविजे दर साला ताजा खुर्द सनाचे उजुर न कीजे तालीक लिहून घेऊन असल परतून दीजे म्हणोन रजा रजेवरहुकूम मौजे मजकुर इनाम देसाई मजकुरासी दुवाला केले असे दुवाला कीजे दर साला ताजा मिसलीचे उजूर न करणे तालीक लिहून घेऊन असल परतून दीजे (पहकोणी शिका ×)

तारीख १९
रबिलावल

---

ले २६ } श्री { श १६१२ माघ व ४
{ इ १६९१ फेब्रु ६

श्रीराम

---

---

—॥ ना
लक्ष्ठ सुनर्मुद्रा
रामचद्र स्य
राजते (पद्मर्मी)

अभयपत्र समस्त राजकार्य धुरधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री रामचद्र नीलकठ आमात्य ताहा देसमुख व देशकुलकर्णी व मोकादमानी व सेटे व माहाजन व समस्त रयानी मा। सिराले सुहुर सन इहिदे तिसैन आलफ दिल्हे अभयपत्र ऐसे जे तुमचे बाबे अताजी विठल मुतालिक देसमुख मा। मार याणी हुजूर येऊनु विदित केले की मा। मार गनीमाचे धामधुमे करिता खराब पडिले आहे ऐसीयास स्वामी कृपाळु होऊनु वतनदारा पासून या पूर्वी कितेक अन्याये जाहाले आहेत ते क्षमा करून अभय देतील तरी आपले पाढरीवरी येउनु मुल्काची लावणी संचणी करितील म्हणून विनती केली त्यावरून तुम्हा वतनदाराचे अन्याये क्षमा करून अभय दिल्हे असे व धारियाचा तह करून दिल्हा चितपर्सील——————

---

× फारसी शिक्का अस्पष्ट.

जिराईत जमीनीस धारा

भात रोते दर । फाली जमीन
बिघा धारा साडे सरासरी दर बिघा
सात मण ।ॅ॥ दोन मण ॅ२

माल जमीनीस सरासरी धारा सवा मण
ॅ१।

पासी इस्तावा लागले सेतास भात
रासल्यास तीन साले व फाले जमीन व
माल जमीन यांस च्यार साले

बागाईत

बिघायणीस धारा दर गला पेरील ।
बिघा होन पा त्यास दर बिघा
[1]थली दर ऊस दोन धारा लिहिला
बिघा दोन होन अडीच पाच मण ॰।॰
होन २ॅ होन
२॥ पाटास
२ मोटास

आलें दर तरकारी दर पासी
बिघा होनु बिघा मनाप इस्तावा
पा दोनी २ ॰॥॰ तीन साले

येणे प्रमाणे इस्तावा देउनु धारेपाचा तह केला असे सदरहू प्रमाणें जो आकार होईल त्याची उगवणी [1]जोवरी गनिमाची धामधूम आहे तोवरी दुतर्फ देउनु[2] कीर्दी महामुरी करणे कोणेविशी शक न धरणें मोहलकी रयत नवी येईल त्या दिवसापासून दोनी साले घर टका व फाला माफ केला असे वरकड नख्त बाब *दडक प्रमाणे उगवणी करून देणे तुम्ही देसमुख व देसकुलकर्णी यांस हक धावयाची मोईन करून दिल्ही आहे चितपसील—

गलीयास दर सदे खडीस दोन खडी २

जकातचे गोणीस तीन रुके ॅ३
सालाबाद चालिले आसेल तरी मजुरा
पडेल नाही तर न घेणे

येणे प्रा मोईन केली आहे यामध्ये देसमुख दोन तकसिमा व देशकुलकर्णी येक तकसीम या प्रमाणे देउनु तुमचे हक बाब चालऊन कोणे बाबे शक न धरिता आपले पादरीवरी येउनु सुखरूप राहाणे तुम्हा पासून या पूर्वी जो अन्याये जाहाला आसेली त्याचा तगादा लावणार नाही आपले समाधान आसो देउनु कीर्दी माहामुरी करणे तुमचा महाल खासगी सामीया (!) खाले नेमून राजश्री कासी रंगनाथ याचे स्वाधिन केला असे हे तुम्हास तह प्रमाणे बिभरवसा देती त्या प्रमाणे चालउनु अभय असे जाणिजे छ १७ जमादिलावल ले

सना
बधि ( गोल शिक्का )
सुरु सुद बार
[ कागदाच्या जोडावर 'लेखनावधी'चे दोन शिक्के ]

---

१ केली असावें २ हे वाक्य विशेष लक्ष्य आहे. * दडक—पूर्वील वहिवाट.

ले. २७ } { श १६२३ श्रावण वद्य ३
{ इ १७०१ आगष्ट १०

श्री

सिक्का तालीक

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्ये राजश्री हिंदुराव घोरपडे ममलकतमदार ता मोकादमान देहाये गावगना प्रो सिराले सुा इसने मया अलफ सानत शकराजी व पिराजी तुलाजी देसाई प्रा मार याणी हुजुर येऊन विनती केली जे सिदोजी निकम याणे प्रा मारचे देशमुखीचा कथला करून साहेबास नाही तो कथला सागून पत्रे घेऊन गेला आहे तरी आपले देशमुखीमध्यें दुसरीयाची गुजाईस नाहा हामेशाही मोकदमी दखल आहे ऐसे आसता पत्रे घेऊन ढोहणा करितो तरी याचे पारपत्य केले पाहिजे म्हणोन विनती केली येसीयास तुलाजी देसाई याची देशमुखी दुसरायास गरज नाही येसा निर्वाह जाहाला तुम्ही हि वतनदार गोत मुखे मनास आणिलेच आसेल सांप्रत सिदोजी निकम पत्र घेऊन कथला करील तरी त्या पत्रावरी येकदर नव जाणे त्याची पत्रे रद असेती शकराजी व पिराजी देसाई याचे विद्यमाने पूर्वी पासुन वर्तणूक करिता तैसी करून वतनी मामला चालविणे दुसरियाचे गोष्टावरी नव जाणे या गोष्टीचा बोभाट येऊ न देणे जाणिजे रो छ १६ रोवल मोर्तब आसे

---

ले २८ } { श १६२६ फाल्गुन शु १३
{ इ १७०५ फेब्रु २५

स्वस्तिश्री नृप शालिवाहान शक १६२६ वर्षे तारण नाम सवत्सरे फालगुण शुध त्रयोदसी रविवार त दिनीं राजेश्री चिल सेटी व सव सटी बिन लिंग सेटी सुटाले वस्ती कसबे करारामाद या प्रति सकराजी बिन तुलाजी निकम देसाई प्रा सिराले लेहून दिल्हे क्रयपत्र येसे जें आपलेयास काल कठीण पडिला काल्क्षेप नव्हे सारिखा विचार पाहून तुम्हास भाऊ करून तुमचे पदरी आपण
पडिलों आपणा या कालात तरावयाचा विचार नाही (अटकोनी शिक्का*)
तुम्ही येश घेऊन आपल्यास या कालात सामील होऊन
आमचा काल कडेस लावणे म्हणऊन तुम्हास आपला विचार सांगोन तुम्हापासीं रा ५००० पाचसे रुपये घेतले अणी तुम्हास अपले वतन पैकी मौजे रेठरे बुद्रुक प्रा मजकूर हा गाव तुम्हास देसमुखी दिल्ही असे येथील अपले वडिला पासुन हक रुसुम चालिला अहे बितपसील—

| | | |
|---|---|---|
| मरल होनु पा ४ | इनाम जमीन पाटस्थळ बिघे ८१५ | तावलीयास दर आठ वडीयास धाजाराचे रोजी |

---

* कागदाच्या ह्या बाजूस शिक्का ही गाष्ट तो फारसी असल्यामुळें युक्त आहे.

उकाला फसकी. बाजाराचे रोजी

चाभाराचे दर दुकाना सालिना जोडा १

कोस्टी याचे भागास दर सालिना

होनु पासोडी
।· १
ू—नख्त

वेतालपटी

तेली यास दर आठ-वडी यास दर दुकानास तेल वजन ०००९ व बाजे घावली जे साले वडिलापासून चालत असेल ते दस्तर सायक

धणगर सणगरास दर सालिना—

घोंगडी होनु
१ ।·
ू—नख्त होनु

पाने सुमार २५ दर दुकानास

मालीयापासून सेर सायक दस्तर मा

रामणूक माहार १

गावात थल भरिता बाजारी निस्वा येईल तो तुम्हास दिल्ह असे ०१

येणे प्रमाणे आपले वडिला पासून चालत अले अहे ते तुम्ही खाऊन सुखरूप अपलापणा राखोन असावे तुम्हसी आपले भाऊबंद कोण्ही कटकट करितील त्यास अपण निवारून तुम्हासी कोण्हास बोलावयास गरज नाही यास अपणा पासून अन्यथा होईल तरी श्री साक्ष असे लेहून दिल्हे अपले इमाने कयपत्र सही सन १११४ छ १२ जिल्काद सदरहु तुम्ही अपणास रु॥ पाचसें रु॥ दिल्हे ते अपणास पावले तुम्ही अपले लेकराचे लेकरी मौजे मजकूरची देसमुखी खाऊन सुखरूप असणे लेहून दिल्हे पत्र सही ( पटकोनी शिक्का )*)

गुता चाऊन पत्र रद जाहाले माघारे घेतले

---

ले. २९ }

{ श. १६३६ माघ शु. १३
{ इ. १७१५ फेब्रु. ५

श्री

० श्री ~

प्रतिपच्चंद्ररेखे
ववर्धिष्णुर्विश्ववं
दिता शंभु छत्रप
ते र्मुद्रा रामसूनो
र्विराजते (गोल शि

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४१ जय नाम संवछरे माघ शुध त्रयोदसी मंद-

---

* फारसी सिक्का व मोर्तब अस्पष्ट. + वर्तुळांतलि दुरेषेंत ५० पाकळ्या आहेत.

| | | |
|---|---|---|
| श्री शि<br>व नापति<br>हर्ष निदान मो<br>रेश्वर सुत नीळ<br>कठ प्रधान | ० श्री ~<br>श्री आइ आदि पु<br>रुप श्रीराजा शिवछ<br>त्रपति स्वामि रुपानिधि<br>तस्य कृष्णाजी परशु<br>राम प्रतिनिधा | वासरे क्षत्रीयकुलावतंस श्री<br>राजा शंभु छत्रपती स्वामी<br>यांणि रा॥ तुलाजी विन<br>शकराजी निकम देशमुख<br>ता॥ सिराले यांसि दिल्हे<br>इनामपत्र ऐसे जे तुम्हीं<br>किले *पनाळा चे मुक्कामीं<br>स्वामि स† येऊन विनंती |
| (मद्रामी शिका) | (गोल शिका) | केली की आपण वतनदार<br>वतनावरी राहोन स्वामीची |

शेवा बहुत निष्ठेने केली वतनाच्या प्रसंगामुळें आपल्या वरी कसाले बहुत पडिले आपली हैरानगी विशेष जाली आहे माहाल खराब पडिला त्या मुळें संवसारकृ्य चालत नाहीं स्वामीनें बहुतां वतनदारांस इनामती देऊन ऊर्जीत केलें आपण हि आजी वर स्वामींचे पायासी निष्टेस अंतर केलें नाहीं आणि पुढे हि होणार नाहीं तरी स्वामींनें लेकराचें लेकरी चाले ऐसा इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणून त्यावरून मनास आणितां तुम्हीं वतनदार बहुत प्रमाणीक स्वामीच्या पायांसी निष्टा धरून वतना वरी राहोन शेवा करीत आहा या करितां स्वामी तुम्हावरी कृपालु होऊन नूतन इनाम कुलबाब कुलकानु सेरीज हक्कदार इनामदार करून मौजे कानदे ता॥ सिराले सुभा मलकापूर [1]देह १ येक रास इनाम अजरामऱ्हामत करून दिल्हा असे तरी तुम्हीं मौजे मार पूर्व मर्यादे प्रा आपले स्वाधीन करून घेणे आणि इनाम तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरनें अनभऊन सुखरूप राहणें सदरहु इनाम तुम्हास स्वामी सुरक्षित चालवितील जाणिजे लेखनालंकार

मर्यादेय
विराजते

| | | |
|---|---|---|
| [ मार्गे ]<br>तेरिख ११<br>सफर सुहुर सन समस<br>असार मया अल्फ | रुजू | [ मार्गे जोडावर ]<br>लेखन<br>सीमा समु<br>ल सती |

बार सुरुसुद बार [ हे २ सिके ]

---

* करवीरापूर्वी पन्हाळ्यगडावर छत्रपतींची राजधानी असे † 'निध' राहिले आहे. १ अगदीं ह्याचप्रमाणें दुसरें पत्र 'देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रांत मलकापूर' ह्यांस दिलें आहे त्यांत एवढाच विशेष दिसून आला.

ले ३० } { श १६४२ श्रावण शु १३
{ इ १७२० आगष्ट ५

श्री नक्कल

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री

कृष्णाजी भास्कर स्वामी गोसावी यांसि

सेवक रामचंद्र नीलकंठ अमात्य हुकमतपन्हा नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत जाणें विशेष राजश्री अताजी विठल मुतालिक देशमुख पा सिराळें यांसी सक्राजी बिन तुलाजी निकम देसाई कर्जाया करितो पाद शाइ महजर व देसाई माार याचें वडिलांही मुतालकीचें वतनपत्र दिल्हें आहे तरी मोग तोस म्हणोन कल्लें त्या वरून हे पत्र तुम्हांस लिहिले आसे तरी सक्राजी बिन तुलाजी देसाइ यास वरे खेंसीनें ताकीद करून पुरातन काली काईदे व इनाम चालत आहे त्याप्रमाणें अताजी विठल याची त्याजकडे चालवणें कोणी सल्ला करील त्यांचें पारपत्य करणें फिरोन बोभाट येऊ न देणे सुहूर सन ईहिदे इसनेन मया व अल्फ छ ११ सवाल बहुत काये लिहिणें मोर्तब सुद

बार

---

ले ३१ } श्री { श १६४५ ज्येष्ठ वा ३
{ इ १७२३ जून १०

छ मा अनाम तुलाजी बिन शक्राजी निकम देसमुख ता सिराले प्रांत मलकापूर यासि श्रीनिवास परशराम प्रतिनिधि सुहूर सन अर्बा अशरीन मया अल्फ तुम्ही साताराचे मुकामी हुजूर येऊन विदित केले की आपण आपले वडिलापासून राज्यात श्रम साहास बहुत केले आणि पुढे हि येकनिष्ठेने सेवा करीन आहो त्यास आपले कुटुबाचा योगक्षेम चालत नाही या करिता कृपाळु होऊन आपणास वतनसमधे नूतन गाव इनाम गाव करून देऊन चालविले पाहिजे म्हणून त्या वरून मनास आणून तुमचे चालवणे अवश्यक म्हणऊन मौजे कोकरूड ता मजकूर हा गाव पेसजीच्या मुकासीया पहून दूर करुन हाली तुम्हास कुल बाबे कुल कानु सेरीज हकदार व इनामदार वजा करून पूर्व मर्यादे प्रा इनाम दिल्हा असे तरी

॰ श्री ॰
श्री आई आदि पुरुष श्री राजा शाहु छत्रपति स्वामि कृपानिधि तस्य श्रीनिवास परशुराम प्रतिनिधि

अष्टकोणी शिक्का

तुम्ही मौजे मार आपले दुमाला करून वंशपरंपरेने इनाम अनुभवीत जाणे तुम्हास मौजे मजकूर इनाम दिल्हा या बदल तुमच माथा सेरणी बदल कबूल केतवा रुपये ४५० साडे च्यारसे करार करून वसूल हुजूर घेतला असे छ १७ रमजान निदेश समक्ष

राजते

लेखना

वधि ( गोल शिक्का )

[ मर्तो ]

सुरु सुद बार

[ जोडावर ' राजते लेखनावधि ' चे दोन सिके ]

---

ले ३२ } श्री { श १६४५ आषाढ शु ~ इ १७२३ जून ३०

॰ श्री ~

श्री आइ आदी पु
रुष श्रीराजा शाहु छ
त्रपती स्वामी कृपानी
धा परशुराम त्र्यंबक
प्रतीनीधी ( गोल शिक्का )

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री श्रीनिवास परशराम प्रतिनिधी ता मोकदमाना मौजे कोकरूड पा सिराले सुहा आर्वा आशरान मया अलफ मुलाजी बिन शकराजी निकम देशमुख पा मार यानी राज्यात श्रम साहास बहुत केले आणि पुढे येकनिष्टने सेवा करीता आहेत याबदल यावरी कृपालु होऊन मौजे मार पेशजीच्या मुकाण्या कडून दूर करून हाली देशमुख मारास इनाम कुल बाब कुल कानु दिल्हा असे सेरजि हाकदार व इनामदार वजा करून गाव मानिलेस इनाम वंशपरंपरने चालवणे प्रतिवर्सी नूतन पत्राचा आक्षप न करणे या पत्राची प्रती लिहून घेऊन हे पत्र भोगवटीयास देणे छ ७ शौवाल पा हुजूर लेखना

वधी

( गोल शिक्का )

बार सुरु सुद बार

---

ले. ३३ } श्री { श १६४९ श्रावण वद्य ९
{ इ १७२७ जुलै ३१

राजश्री तुलाजी देसाई
पा सिराले गोसावी यासि

छ असहित लक्ष्मी आलकृत राजमान्य—श्री उदाजी चवाण हिमतबहादूर रामराम सुहूर सन समान असरीन मया अलफ तुम्ही हुजूर येऊन विदित केले जे पा मजकूरचा कारभार होतो तो आपल्या विद्यमाने होत नाही आपण देशमुख आपणास दसलगिरी असावे म्हणोन त्यास तुमचे चालवणे आम्हास आगत्य या करिता साल मजकुरा पासून जो कार्यभाग पा मजकूरचा घेणे तो तुमचे हाते घेऊ येविसी अतर नाही आपल समाधान असो देणे बहुत काय लिहिणे छ २२ जिल्हेज मोर्तब सुद

( गोल शिक्का )

* ० श्री ~
श्री शाहु भु छत्र
पति चरणि तत्पर
राणोजी सुत उदा
जी चवाण हीम
तबाहदर ( गोल शिक्का )

( येथे हा कागद इ १८५० मध्ये फिर्याद प्रसंगी पुराव्यास म्हणून दिला त्याची व नक्लेची नोंद आहे ती घेतली नाही )

---

ले ३४ } श्री { श १६५१ मार्गशीर्ष वद्य ४
{ इ १७२९ नोव्हें २८

राजश्री तुलाजी देसाइ मा
सिराले गोसावी यांसि

छ अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य—श्री उदाजी चव्हाण हिमत बाहादर रामराम सुा सलासीन मया अलफ मौजे सांगडे सुा मा मार हा गाव आम्ही आपले तर्फेने तुम्हास दिल्हा आहे तेथील आबादानी करुन आकार होइल तो साल दर

* सिक्का अस्पष्ट लागला आहे १ सन ११२८

साल पेन जार्णे ये विसीं गांवांस आलाहिदा सनद सादर आहे आम्हां कडील कांणे विसीं तोसीस लागणार नाहीं जाणिजे छ १७ माहे जमा* बहुत काये लिहणें† मोर्तब

मुद्र
( शत्कोना शिक्का+ )

[ मागें ]

( अष्कोणी शिका+ )

---

ले ३५ } श्री { श १६५९ ज्येष्ठ वद्य ७
{ इ १७३७ जून ८

राजश्री तुलाजा निकम देशमुख
पा सिगलें गोसावीं यासि

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य——श्री येसाजी भोंसले मुद्दर सन समान सलासीन मया अल्फ रा सिवजी हरि व रा विठलराव बल्लाल हुजुर आले याणी तुमचा मुद्दा विदित केला त्यावरून राजश्री काका साहेबास पत्र पाठविलें आहे व मला माणूस हि येईल तरी तुम्ही राजश्री चा आज्ञा घेऊन येणें सताजी देसाई या विसी मजकूर सांगोन पाठविला तो माहारनिले याणी विदित केला तरी तुम्ही दर्शनास आलिया उपरी पाच पाटील पाच देशमुख पांच देश पांडिये मिळोन ने सांगताल त्या प्रा तुम्हा उभयतास वर्तऊ कोणाची पाठ राखणार नाहीं येविसी आपला निशा असो देणें कोणी गोष्टींचा सशये न धरितां भेटीस येणें जाणिजे रा छ २० सफर[1] मोर्तब

| |
|---|
| ० ~ |
| श्री राजा |
| शाहु चरणि |
| तत्पर येसाजी |
| भोंसले नी |
| रंतर |
| ( अष्टकोणी शिक्का ) |

मुद्र अष्टकोनी शिक्का

---

* पुढून गळें दिसावल ' ? † शुद्धार्थ अक्षर + येथें ले ३३ प्रमाणें उदाजी चव्हाणाचाच मुद्रा व अक्षरशः तशाच आहे पण आकार तेथें गोल तर येथें अष्कोना आहे अर्थात् समाप्ति मुद्रा षट्कोनी

१ मिती अव्वल साल धरून काढली आहे

ले. ३६ }    श्री { श १६७६ कार्तिक व ३
{ इ १७५४ नोवें ३

राजश्री सडोजी माणकर
गोसांवि यांसि

७ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य——श्री बालाजी बाजीराव प्रधान असिर्वाद सु॥ समस समसैन मया व अलफ तुम्हीं पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले तुलाजी निरम देशमुख घर्तासिसिरालेकर यास पनास रुपये मसाला घेऊन हुजूर पावयाची आज्ञा केली जासूद माानिलेन्हा घरी मसालीया साठी कटकट करितात आणि हे तो आम्हाजवळ आहेत कांहीं कार्य सांगितले आहे येसे + + + + + + + + + + + + फिरोन + + + + + होईल या + + + + + मुसास तारिख + + १७ मोहरम बहुत काय लिहिणे

लेखन (गोल शिक्का)
सीमा

---

ले. ३८ } श्री { श १६८४ फाल्गुन वद्य १
{ इ १७६३ मार्च ८

छ मा अनाम तुलाजी देसाई पा सिराळे यासि माधवराव बलाल प्रधान सुा सलास सितेन मयां व अलफ मौजे कोकरुड पा मार येथें तुमचा वाडा पुरातन होता त्यास सांप्रत पार्वतीबाई भोंसली यांणी पाडला आहे ये विसीं तुम्हीं हुजुर येऊन विनंती केली त्यावरून त्यासहि सरकारचें पत्र सादर केलें असे व तुम्हांस आज्ञा केली असे तरी तुम्हीं मौजे मजकुरीं सुदामत वाडा होता त्याप्रों बांधणें जाणिजे छ २२ शाबान आज्ञाप्रमाण

श्री ०
राजाराम न
रपति हर्ष निधा
न माधवराव ब
ल्लाळ मुख्य
प्रधान
गोल शिक्का

लेखन (गोल शिक्का)
सिमा

ले. ३९ } श्री { श १६८४ फाल्गुन व १
{ इ १७६३ मार्च ८

(थोर माधवरावांची मुद्रा ले ३८ प्रमाणें)

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान तां रोनाजी बलाळ पनकी पा सिराळें सुा सलास सितेन मयां व अलफ मौजे कोकरुड पा मार येथील ठाणीयासीं तू कज्या करितोस देसा(ई) यांसीं सुदामत वर्तन नाहीं म्हणोन हुजुर विदित जाहाले त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे तरी ठाणे मजकूर यांसीं कज्या न करणें व देसाई देशपांडे यांचा हक सुदामत चालत आल्याप्रों देत जाणें ये विसीं फिरोन हुजुर बोभाट येऊ न देणें जाणिजे छ २२ शाबान आज्ञाप्रमाण

लेखन (गोल शिक्का)
सिमा

ले. ४० } श्री { श १६८५ चैत्र वद्य ५
{ इ १७६३ एप्रिल २

चिरंजीव राजश्री गंगारामपंत यासि प्रति अच्युतराव गणेश आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लिहित जाणें विशेष तुलाजी देसाई याज कडे सरकारचे नजरेचा ऐवज रुपये बारा हजार येणें आहेत ते त्याजकडून वसूल करून घेणें आणि तुम्हाजवळ त्याची ताकीदपत्रें दिल्हीं आहेत तीं त्यास पावती करणे काक रुडचे गढींचें* काम अद्याप चालत नाहीं त्यास ये विसीं तुम्हीं देसाई याचे साहित्य करोन गढीचें काम चालें ते करणें राजश्री विष्णुपंत व राणोजी सिंदे यांज कडील कारकून व राऊत सिराळ्यास गेले आहेत ते यांसीं सटसट करितात व सिराळकर

याजवर हाला करणार म्हणून याणी लिहिले त्यास स्वारास व कारकुनास¹ पत्र पाठविलेच आहे व पेशजी येथून †दलाईत पाठविले आहेत ते हि त्यांज पासी ²आहेत तुम्ही देसाई याचे साहित्य करून सिराल्कर व कारकुन व राऊत यासी सरसट न करीत ते करणें ‡सा म्यारची निशा करून घेऊन हुडीया खानदीयान्या पाठऊन देवणे सिराल कर लनाडी करतील तर पारपत्य करणे परतु पेक्याची निशा करून घेवणे आम्हांस येक घोडी किंवा येक हजार रुा यावे याची निशा करून घेवणे दिवानचे रुा आकराचीऽ हुडी सातारीयाची पाठऊन देणे हे रुा श्रीमंतानी ज्यास देविले आहेत त्याचा तगादा आहे देसाई मार याजला सागोन सरकारची पन+ राखावी गडीस उपद्रव तिलमात्र होणार नाही जाणिजे छ १७ माहे रमजान सा सलास सितैन मया अरक बहुत कार्ये लिहिणे हे आसिरवाद

---

ले ४१ } श्री { श १६८५ वै शु १०
{ इ १७६३ एप्रिल २३

राजश्री तुलाजी निकम देसाई

ले. ४२ } 		श्री 		{ श १६८६ श्रावण वा २
{ इ. १७६४ आगष्ट १३

नकल

सिक्का

छ. वेदशास्त्रसंपन्न राजमान्ये राजश्री गोपाळाचार्ये बिन माधवाचार्ये मांगलेकर गोत्र काश्यप सूत्र आश्वलायेन वास्तव्य कालगांव प्रांत कराड स्वामींचे शेवेसी शेवक तुलाजी बिन सकराजी निकम देशमुख पा मिगले शके १६८६ तारण नाम संवछरे श्रावण वद्य द्वितीया इदु वासरे त दिनीं तुम्ही मौजे कोकरुड येथील मुक्कामी येऊन विदित केले की आम्ही श्री 	कृष्णातीरी वास्तव्य करितो येसीयास आपले देशमुखीच्या इनाम पैकीं आम्हांस काही नूतन जमीन इनाम करून देऊन चालविलीयां तुम्हांस श्रयस्कर त्यावरून विच्यार पाहतां तुम्ही भले ब्राम्हण सिष्ट विद्यापात्र कुटुंबवछल श्रींच्या तीरी वास्तव्य करिता कुटुंबाच्या योगक्षेम तुमचा चालविलीया श्रेयस्कर आहे व आमच्या कुळाचा उधार व आमचे वौशाचे कल्याण येसे जाणून श्रीवारुणावती मध्ये आर्धोदकीं (थी!) स्नान करोन तुम्हांस धारादत्त जमीन उतम प्रतीची हाली काळी च्यार बिगा पांडाची विनीयाने येणेप्रो बिनपसील—

मौजे कदि प्रांत मार येथील आमच्या देशमुखीचा इनाम
जमीन बिघे ०५

मौजे वसी प्रांत मार येथील आमच्या देशमुखीचा इनाम
जमीन बिघे ०५

येकूण बिघे सुमार १० दाहा कुल बाब कुल कानु देखील इनाम तिजाई व पर्न पलगी जलतरुतृणकाष्टपाषाणनिधिनिक्षेपसहीत धारादत्त करून दिल्ही असे तरी तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वौंशपरंपरेने वृतजमीनींचा उपभोग करून आमचे वृतीचे कल्याण चिंतून सुखरूप राहणे आमचे वशीचा कोणी धारादत्त वृतीस विक्षेप करील तरी येथें श्लोक..........* वृतीसी हरण केलीया श्लोकोक्त पातक व चालविलीया चतुर्थश्लोकोक्त पुण्य आहे येसे जाणून आमच्या वौंसीचा जो असेल तो व हर कोणी तुमचे वशपरंपरेनें चालविल्यासी अंतराय होणार नाही हे लेहून दिल्हे वतनपत्र सही जाणिजे छ १४ माहे सफर बहुत काय लिहिणे कृपावृध्धी केली पाहिजे हे विनंति मोर्तब असे

* येथें "स्वदत्तां परदत्तां वा॰" "न विषं विषमित्याहुः", "स्वदत्ता दुहिता" अपर्ण "दानपालनयोर्मध्ये॰" हे चार श्लोक दिले आहेत ते अशुद्ध आहेत

प्रस्तुत शर्तनाम्याच्या दोन प्रती असून पैकी एक तत्कालीन (!) असली तरी तिचा शेवटचा भाग नसल्यामुळें नक्की व पुरता सन सापडत नाही दुसऱ्या प्रतींत शक १५७४ नंदननाम संवत्सर आहे. पण या वर्षी सुहूर सन इसने खमसेन असा पाहिजे होता परंतु या ठिकाणीं 'आर्बा खमसेन आहे'; व ही नक्कलकाराची चूक असावी. कागदांची रुजवात श्री द वि आपटे व श्री पुरंदरे व श्री य रा गुजे, बी ए, एम् आर. ए. एस्., रि रे इ वडवाथरकर, यांनीं घेतली आहे ।

शर्तनाम्याप्रमाणें शहाजी-बाजी ह्याचा हा एकोपा फार दिवस न टिकतां बाजीराजे घोरपडे यांना शिवाजी राजे यानीं ठार मारल्यावर या एकाच घोरपडे व भोसले या शाखेचे दोन परस्पर विरोधी पक्ष उघडपणें निर्माण झाले छत्रपती शिवाजी राजे यांचे मनांत बाजी घोरपडे यांचा वंशच नष्ट करावयाचा होता परंतु ही गोष्ट पार न पडता बाजींचा वडील मुलगा मालोजी राजे जिवंत राहिला व त्यास विजापूरचे आदिलशहानें आणून सरदारकी दिली, असें मालोजी घोरपडे यांचे पदरीं असलेला पर्शिअन इतिहास (बखर) कार म्हणतो या ठिकाणीं इतिहास लेखक व लिहून घेणारे मालोजी राजे घोरपडे याची माहिती एकांगी दिसते कारण त्यांना बाजींचा वडील मुलगा नावजी राजे घोरपडे हा जिवंत आहे, हें माहीत असूनही तो स्वराज्यशाखेस मिळाला एवढ्यावरून त्याचा नामनिर्देश इतिहासांत केलेला दिसत नाहीं खालीं लागू पुरता विश्वसनीय वंशवृक्ष, क्र २१३।५ इ कागद दिले आहेत त्यांतील व सनदेंतील वडिलपणाचा निवाडा व क्रमाक पाच या कैफियतींतील मजकूर पाहतां बाजी राजे यांना मालोजीहून वडील मुलगा नावजी राजे घोरपडे या नांवाचा होता आणि त्यास तासगांव नांदगांवची पाटीलगी व सातारा तालुक्याची देशमुखी सांभाळून रहाणेम बाजीराजे यानी सांगितलें असतां तो स्वराज्यशाखेस मिळाला, म्हणूनच आदिलशहाने मालोजीस सरदारकी दिली असें दिसतें शिवाय शि च सा ख ५ ले ४८ भाइळे घोरपडे या प्रकरणांतूनही हाच निष्कर्ष निघतो त्यांना मुसलमानाच्या नोकरीचा पुरा वीट आलेला दिसतो म्हणून ते आपलें वडिलकीचें पाटीलकी व देशमुखी वतन सांभाळून स्वराज्यसेवा करीत राहिलेले दिसतात हें २१३ वर्षापूर्वी प्रसिद्ध झालेल्या कागदावरून दिसतें बाजीराजे घोरपडे यांचे पश्चात् बाजींचा वडील पुत्र नावजी हा मुधोळ जहागिरीचा खरा वारस असूनहि त्यानें स्वराज्यप्रेमामुळें मुधोळ जहागिरीचा स्वार्थत्याग करून स्वराज्यसेवा केली नावजींचे पश्चात् राघोजी व सताजी हेही स्वराज्यसेवा करीत होते व राघोजीपुत्र भानाजी हे स्वराज्यसेवा करीत असतांनाच 'भांडणी ठार झाले' असा सनदेंतून उल्लेख आहे. वडिलकीचे व पाटीलदेशमुखीचें वतन यांत वाद उत्पन्न झाला त्याचे पूर्वीपासून, वतन वडिल नावजी घोरपडे यांचे घराण्याकडे चालत होते, हें हमशाही गोताचे निवाड्यावरून व अकोजी घोरपडे मुधोळकर हे वडिलकीचे पाटिलकी व देशमुखीचे खरे मालक नसलेमुळे हजर जहाले

माहीत यावरून सिद्ध झालें नावजी घोरपडे यांची शाखा थोरले माधवराव प्रधान-अखेर स्वराज्य पक्षाकडे चालत आली सदर शाखेकडे सनदेंत नमूद केलेल्या कांहीं गांवांचा देशमुखी व पाटिलकी अद्यापर्यंत याच शाखेकडे चालत आहे. नावजी घोरपडे याचे शाखेचा व मुधोळकर घोरपडे यांचे शाखेचा पत्रव्यवहार पहिले व्यंकटराव राजे घोरपडे मुधोळ स्टेट याचे वेळचा असून तो पुढें प्रसिद्ध होईल, त्यावरून हें कळून येईल तात्पर्य ह्यासकारें या वडिल शाखेची माहिती अप्रसिद्ध अशाच राहिली फक्त शि च सा स ५ ले ७२ 'घिरे यांचें वाई देशपांडे यांस निवाद पत्र' ह्यावर राघोजी बिन नावजी घोरपड देशमूख ता। सातारा म्हणून सिक्का आहे. त्यावरून रानोजी घोरपडे वडिल घराण्यातील असून त्याना सिक्का वापरण्याचा अधिकार होता, हें दिसतें नावजी घोरपडे याचा समाधि तासगांव ता सातारा एथे आहे. लागूपुरता घोरपडे यांचा वंशवृक्ष दिलेला आहे-

(१)




---

(२)

ले ७३ }
मू न प }

श्री

{श १५७४
{इ १६५२

+(शर्तनामा स्वस्तिश्री नृपशालिवान शके १५७४ नंदननाम संवत्सरें सुरुर सन अर्बा समसेन अलफ कारणे राजश्री बाजी राज व अंबाजी नाउजी राज घोरपडे

---

+ शक १५७४ म्हणजे मुहूरसन (सुरर नव्हे) १०५२ रबिलावल ३०, ते सु स १०५३ रबिलाखर २८ पर्यंत—पण येथें ह्या सन १०५४ दिला आहे अर्थात् ती चूक आहे.

गोसावी यासि स्नेहपूर्वक माहाराज राजश्री शहाजी राजे भोसले जोहार लेहून दिल्हे शर्तनामा ऐसा जे तुम्हा आम्हा ) मध्यें काहीं कुसूर पडिला होता त्या निमित्य हजरती आलम पन्हा साहेबीं आपणा हुजूर येक करुन परस्परें समाधान केले तेसमई हजरती साहेब बोलिले जे तुम्ही परस्परें एकएकास आपले तर्फेनें तश्रीफ आपले मिरासी वतन देणें त्यावरून तुमचा कुसूर तुगेन बेकुसूर पादशाही कामावरी साबीत आसणें त्यावरी पेसजी तुम्हास परगणे त्रिनामलचे देशमुखी मिरासी आजरामऱ्हामत करून दिल्ही होती होन चकें हजार ६००० साहा हजार ते तुम्ही आम्हास मिरासी देशमुखी करून दिल्ही आम्ही तुम्हास आपली मिरासी देशमुखी व सरदेशमुखी पा कऱ्हाड देशमुखा व सरदेशमुखापैकी देहे २२ बाविस घी तपसील

का शेलगाऊ देहे ११ याचा हक व इनाम

ता पाली तुमचा मुकासा देहे ११ याचा हक व इंनाम

येकून हक व इनाम बेरीज

| | | |
|---|---|---|
| मक हक होन पातशाही | | इंनाम गांवगना चावर वीस चावर |
| १५८॥।-। | ता पाली देहे ११ | २० |
| १२७८-। | ता शेलगाऊ देहे ११ | |
| २८२ | | |

यावेरीज मोहनका शेत व धार व पाने व गुऱ्हाळास गुळ व बकरे व

(अपूर्ण)

---

ले ७४ } मू दा प }

(३)

श्री

{श १६४० चैत्र वद १४ {इ १७१८ एप्रिल १८

(असल)

श्री

श्री आदं आदि पुरु
ष श्री राजा शाहु छत्रप
ति स्वामि कृपानिधि त (अष्टकोनी)
स्य श्रीनिवास परश
राम प्रतिनिधि

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री श्रीनिवास परशराम प्रतिनिधि ता मोकादम देहाये व शेटिये माहाजन माहनाल पेठनिहाये व धनगर कष्टा व हाण पतरा( पा )ते+सुनानीं ताा कालास मुहूर मन समान अशर मया अल्फ राा यशोजी पि सनाजी पाटपडे देशमुख निमे ताा मसूर पाजी हुजूर

येऊन राजश्री स्वामि सनिध विनंती केली की आपले वडिल राणो बाजी घोरपडे निमे देशमुख ता। मार व पगेलकी निमे मौजे नादगाउ व निमे मौजे तासगाउ हे वतन यांणी अनभविले यांचे वडिलपुत्र थोरले बाईकोचे पोटीचे नावजी घोरपडे व धाकटे पुत्र आणि धाकटे बाईकोचे मालोजी घोरपडे नावजींचे पोटी दोघे पुत्र जाले वडिल राघोजी घोरपडे आणि धाकटे सताजी घोरपडे हे वडिल बायकोचे व धाकटे बाईकोचे म्हालोजी घोरपडे येकूण तिघे जाले त्यास राघोजी घोरपडे याचे पोटीचे मानाजी घोरपडे व सताजीचे घोरपडे याचे पोटचे आपण त्यास राघोजींचे (पो)टीचे मानाजी घोरपडे होते ते माडणी ठार जाले याकरिता राघोजी(चे न)क्ल जाले सताजींचे पोटीचे आपण आह्मो आपले बापाने मुतालिक ठेविला होता आणि वतन चालवीत होते त्या उपरी हा प्रांत हाजरत अलमगीर पादशाह यास कबज जाला गडकोट घेतले तेव्हां आकोजी घोरपडे म्हणजे मालोजी घोरपडे याचे पुत्र आतां मुधोळीं आसतात त्यास मोगलाईत (चाकरी) आहे त्याची चाल होती या प्राते आसीनखान फौजदार मोगलाकडील कराडी होते त्यास येऊन मेगेन मुतालिक आपले निसबतीने नरसो त्रिमल ठेविले त्यांणी मुतालकी मोगलाचे कारकिर्दीमध्ये केली त्या उपरी मागुती स्वामिस (हा प्रात) अर्जानी जाला गडकोट मागलाकडून परतोन घेतले तेव्हाही काही दिवस नरसो त्रिमल होता त्या उपरी मृत्य पावला आकोजीने नरसो त्रिमल याच्याच लेकास गोविंद नरसिंह यास मुतालकी करार (करून) ठविला ऐसियास आकाजी घोरपडे [1]यांचे बाप म्हणजे नावजी घोरपडे बीन बाजी घोरपडे याच सावत्र भाऊ आणि धाकटे त्यास काही देशमुखीचे वडिलपण चालवयाचा आधिकार नाही नावजी घोरपडे वडिल त्याचे घराणियातील आपण तरी आपले वतन आपणास बहाल करून दिल्हे पाहिजे म्हणऊन विनती केली त्यावरून देशमुखाचे वतन व दोही गावाच्या निमे निमे प्रा पाटीलगाया अमानत करून बाजोजी बीन सताजी घोरपडे आपण वडिल म्हणऊन उभे राहिले आहेत वतन अमानत केले आहे तरी तुम्ही आपले निसबतीचा कोण वादास पाठवणे आसेल त्यास पाठऊन देणे येसे पत्र पाठविले परतु त्यांणी कोणी वादास पाठविला नाही वरीसभर वाट पाहिली या उपरा हे मागुती उभे राहिले आणि आज केला की आकोजी घोरपडे याचे कोणी वादास न ये आपण वाट किती दिवस पाहावी या उपरी स्वामिने हमशाही वतनदार गोत आहे मनास आणून आपले वतन आपले स्वाधिन केले पाहिजे त्यावरून मनास आणिता बाजोजी बीन सताजी घोरपडे हे वडिल घराणियातील हे खरे ऐसे समस्त वतनदार हमशाही गोताचे मते जाले या करिता याजवर कृपाळू होऊन निमे देसमुखी ता। मार व पाटीलगी निमे मौजे नादगाऊ व निमे पाटीलगी मौजे तासगाऊ करार केले असे बिता।

---

१ तेव्हांच पण ओळींचे वर लिहिलेला

साताा हा उज्याड जाहाला होता तेथे मुक्कामास आले तों गावातून कुभार येऊन आमचे वडिलास सदरी लिहिली हाकिकत सांगितली नतर आमचे वडिलांचे वडिल विज्यापुरास जाऊन सदरी लिहिला हा माार वाड्यार यास विदित करून मौजे माारचे येथील मजला पाटीलकीचे वतन करून दिल्हास मी वसाहात करीन आसी विनती केली त्याजवरून सरकारांतून मौजे माार येथील पाटीलकीचे वतन आम्हास करुन दिल्हे मग आमचे वडिलांचे वडिल मौजे मारी येऊन त्याणी गांवची वसाहात केली परंतु जमिनीची लागण कुलभरणा नाही याजमुळें होइना तेव्हां ताटे यास आणून आ(म्हा)कडे दरोबस्त वतन चालत होतें त्याजपों लागणी बदल निमे वतन देऊन लागण केली आणि आपल्याकडे वडिलपणाचे निमे वतन ठेविले त्यास बहुत वर्षे जाहाली त्याप्रमाणे (हाली वहिवाट चालली आहे) आम्हाकडे वडिलपणाचे मानपान दरोबस्त चालतात आमचे पाठीमागून आमचे वडिलांनी ताटेयास मानपान दिल्हे आहे त्यामो तेही वहिवाट करितात व पाटीलकीची वहिवाट मौजे मारी राहून करितो मूळवतनदार दोघे होते आणि वतन आम्हास मिळाले वडिल आम्ही सदरहू वतन खरेदी घेतले नाही व आमकडे वतन चालत आहे त्याजपैा कोणास दिल्हे नाही हाली तक्षिमा दोन चालतात या प्रमाणे मजकूर आहे तो सरकारांत लिहो दिल्हा आहे जर करिता चौकसीनें खोटा माार लिहो दिल्ह आसे शाबुद जाल्यास सरकारचे गुन्हेगार आम्हा होईल त्यामो वर्तणूक करून ही याद लेहून दिल्ही सही मिा भाद्रपद वाा ५ शके १७६४ शुभकृतनाम सवसरे छ १८ माहे साबान

निाा नांगर मालकाचे हातचा बे हुजूर खंडेराव घोरपडे पाटील

विाा बाळकृष्ण अनत कुळकर्णी मौजे माार

---

ले ७७ } मू दा प }

(६)

{श {ह

(लिंबाजी घोरपडे देशमुख) + + साताा विद + + + + जी नरसिंह

६४ मौजे मांडवे
१ बकरे दसरा
६३ हक व इनाम व सणवार
६४

५६ मौजे कुसवडें
१ बकरे दसरा
५५ हक व सणवार
५६

४३ मौजे दे(गांव)
१ बकरे दसरा
३० येन
१२ सणवार
४३

१३ वाडी पिलाणी
१ बकरे दसरा
१२ येन हक
१३

५१ मोजे पाडली
१ चकरे दसरा
५० हक व इनाम
५१

७२ मोजे निनाम
१ माहाल मजकूर
१ चकरे दसरा
७० येन हक+ ×
७२

मोजे करंजी ×
१ चकरे दसरा
३० × × × ×
१ सणवार

७१ मोजे आसणगाव
१ चकरे दसरा
७० येन हक व इनाम व सणवार
७१

४७ मोजे सोनापूर
१ चकरे दसरा
४० येन हक
६ सणवार
४७

४१ मोजे माजगांव
१ च(करे दसरा)
४० येन हक
४१

(अपूर्ण)

---

(७)

ले
मू

१ मौजे गानगांव ऐन ×× ४६ व हक्दारी व इनाम नगदीपैकी थोडा ऐवज पावली हक्दारी एक्दर देत नाहीत कलम १

१ मौजे सेदरे पहिला पवळाद ईनाम व हक्दारी देत नाहीत ऐन रुपये ३७ पैकी अलिकड शो वीस देतात हक्दारी ईनाम देत नाहीत कलम १

१ मौजे सेलकेवाडी गाव एक्दर सनदे आकारा या ऐवज देत नाहीत मोहगम रा। १० दाहा व गला धारुल ८२ येणे मो पूर्वीचा ईनाम आहे तो देत नाहीत कलम १

१ मौजे वरये ऐन रा। पनास देतात हक्दारी एक्दर वसूल पडत नाही कलम १

(अपूर्ण व याचे तीन पानपैर्शी एकच आहे.)

---

(८)

ले ७९
मू दा. प

१ घोरपडे देशमुख यांच्या गावचा आकार कर्जपटीस सरकारातून वसूल करणे ऐसी आज्ञा त्यास तुम्ही म्हणता की मालोजीराजे देशमुख याचा निमे ऐवज देऊ त्यास त्या गांवचा आकार दोन हिसे रा। ४५६ होतात व याजोजी देशमुख याजकडे तासगांव नांदगांव वजा करून रुपये दोनशे होतात या प्रमाणे आहे तरी तुम्ही आकार प्रमाणे पाठवणे म्हणजे बाजोजी देशमुखाकडे ×××× त्याजवर रोखे केले जातील

---

(९)

ले ८०
मू दा प

श्री

श १७०३ ज्येष्ठ शु १४
इ १७८१ जून ५

(असल)

दस्तक सरकार राजश्री बाजोजीराजे घोरपडे ठाणे मौजे नांदगांव ता चौकिदारानी व रहदारानी व बाजे लोकानी व मोकदमानी व जकाती माहालानिहाये सुहुर सन इसने समानीन मया व अलफ ठाणे मजकुरी सरकारच्या वाडियात पागा बाधावया करिता तारल्याहून गाडे २ लाकडे अडीगाडी घेऊन वगैरे लाकडे घेऊन इमारतीची येतात त्यास दोन गाडे यास हशिलाविसी व जकातीविसी तगादा न करणे सुरलि(त) येऊ देणे जाणिजे छ १२ माहे जमादिलाखर मोर्तब सुद मोर्तब

सुद (अष्टकोणी)

---

(१०)

ले. ८१
मू दा प

श्री

ता सातारा येथील देशमुखाचे वतन बाजोजी घोरपडे याजकडे ता मजकूरचे वतन सुदामत चाल्त असता दरम्याने भगवत सिवराम याणी मारानिलेच्या देश मुखीच्या गावावर रोखे करून तनासी खलल केली आहे त्यास भगवत याणी (राजे) मालोजी घोरपडे याणी सांगितले त्यावरून बाजोजी घोरपडे याच्या वतनासी खलेल करून गांव नारने केले त्याजविसी पत्र की मालोजी घोरपडे याणी गैर वाका भग वतास सांगितिले त्यास ता मजकूरचें वतन सुदामत [1]चाल्ते बाजोजी घोरपडे याजकडे चाल्त अल्याप्रमाणे देशमुखीचा हक व ईनाम गावगना हकदारीचा वसूल घेताल तुम्ही तेथील दखलगिरी न करणे म्हणून पत्रे

१ गावगना ता मजकूरचे मोकदम यास

१ भगवत सिवराम

१ कृष्णराव अनत

१ बापुजी सामराज यास की तुम्ही गांवगनाचा वसूल करून बाजोजी घोरपडे याजकडे देणे म्हणून पत्र

---

(११)

ले ८२
मू दा प

श्री सेकर मसन

श १६८४ चैत्र शु १३
इ १७६२ एप्रील ६

(असल)

० श्री ~
राजा शाहू च
रणी तत्पर सदा
शिव शामराज
निरंतर[2]

अजरवारी राजश्री सदासाव शामराज ता माकदमानी मौजे तासगांव ता (साला) रा सुा इसने सीतैन मया व (अल्फ) ×× जी घोरपडे (देश) मुख ता मजकूर (र्था) ×× जे शाहपूर (चे) ईनामाचे जम ×× बदल श्रीमत माहाराज छत्र (प) ती स्वामी कैलासवासी याणी मौजे मजकूर पैकीं पड जमीन बिघे ९८ आठ

---

१ हा शब्द लिहून त्यावर दोन रेघा ओढून खोडला आहे. २ वाटोळा व तीन कडयांचा

देविली आहे येविसी राजश्री पतप्रनिनिधी यांची सनद गावास आलाहिदा सादर आहे तरा सदरहु प्रमार्णे पड जमीन आठ बिघे चतु सीमा पूवक घोरपडे मजकूर यांचे दुमाला करून वशपरपरेनें चालवणे प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्यपत्र भोगवटीयास परतोन देणे जा(णि)जे छ १० रमजान मोर्तब[1]

सुद

( )

---

(६१)

ले ८३ }
मू दा प }

श्री

{ श १६७८ चैत्र शु १४
{ इ १७५६ एप्रील १४

(असल)

मा। अनाम बाजोजी घारपडे देशमुख ता। सातारा यासि सदासिव अपाजी नामजाद खालसा प्रां सातारा सुा। सीत खमसैन मया व अलफ तुमचे भेटीचे प्रयोजन आहे तरी सिताब येणे या कामास याकुबखान व धोंडजी खालोखा पा। असे यास रुपये २ दोन देणे छ १३ रजब मोतब सुद राजतें (वर्तुल)

~ श्री ०
राजा शाहूच
रणी तत्पर आ
जी रनुम
त किंकर
(वर्तुळ)

बार

लेखना
वधी

---

# २७ रहिमतपूर गांवची मोजणी

(श्री श ना वत्स जोशी)

ले ८४ }
मू दा प }

(श्रीकार फाटण्यांत गेला असावा)
*

{ श १५९७
{ इ १६७५

(असल)

+रकम दस्त का। रहमतपूर सा। कोरगाऊ पा। वाई सुा। सन सीत सबैन अलफ अज जमीन चावर ११००३ बिघा

| अवल | दूम | साम |
|---|---|---|
| ५८॥११ | ३१॥२१॥। | २० |

पैकी वजा बाद आजी माल बाजे खडक माल गायेरान जमीन पुरवण नाही येकून जमान चावर १९ बिघा

---

* दौलताबाद + पा स ६।६४ २ बाटोळा व तीन फड्यांचा

| | | | |
|---|---|---|---|
| देशकुलकर्णी पा। मा। | ॥ | ॥ | ० |
| मोकदम का। मजकूर | २८२० | २८२० | ० |
| कुलकर्णी | ॥। | ॥। | ० |
| जोतिसी | ।१० | ।१० | ० |
| चौगला | ८१० | ८१० | ० |
| काउजी राजमुख्य | । | । | ० |
| गोपजी माहजन | ॥ | ॥ | ० |
| नारायेणभट विन आमचदभट* | ॥ | । | ०। |
| सिवाजी त्रिंबक | ०। | । | ० |
| परसरामभट विन मेरुभट गिजरे | १ | १ | ० |
| | १८॥१२ | १४८९८२ | ०।२॥३ |

तुरवत रोजा रणदुलाखान साहेब जमीन चावर ३२८२३॥

| आवल ३१८३। | दूम चावर १८२०। |
|---|---|
| यासि नफरगत | ११९ लाडाजी मुजावर |
| १।७ हफीज सलादीदेस (?) इमाम | ॥।११ मुला फकार |
| १८९ आवजी उदी | । २५ विठोजी माहलदार |
| ॥।११ मुला हसन बिन आवदुल रहिमान | ॥ १४ अली खोतु मुदबखी |
| ॥।११ मुला अहमद | । १२ गवरोजी दिवख्या |
| ॥।११ माहदजी जामदार | । ८ अचाजी फुलारा |
| । सीद सेटी कोठीवाला | । १६ महमद मलिक सडेभोई |
| ॥६ वली भोई | ॥ १४ अबदुल नबी मोलाबीर |
| ॥।११ आवदुल कादीर | ॥।२५ विसो जिवाजी निसेदा |
| ॥६ मुला हुसेन भायड | ०॥ विचित्र कलावत |
| ॥ २० शाहाजी हैस नाइक | ॥।११ मुला मदमद बिन आवदुल |
| ॥।११ दावलजी बदा | ब खान हफीज |
| ॥।१२ घोडजी छत्र्या | ४ मुतवली |
| । ७॥ मुरसी (?) मुरगवाद | अवल दूम |
| १ सेख सली मुला | ३॥१८ ।१२ |
| ॥२७॥ अवल | १ राम कोटी गोंडा |

*छापुर्डे दोन अक्षरी शब्द खाडाखोड झालेला आहे. त्याचे सूर्य, धिरे इ. वाचन होईल

।२॥ दूम
—
१

२ हजी महमद सतीब

॥१९ मुला मलिक फगस

१ राम जोसी तासकरी

॥ १ येसाजी जामदार

१ येलई पागीण

१०२९मुला सिराज हेंगी

॥१९ मदारी दमामी

—

०। बुदा फरान

०। ८ मसदूम निसाली —

॥ ६ शादू मलिक

०५ हजाम

। कुंभार

। धाची ।

। ———

३२०२ ०॥

तेरीज यक्दर

| | जमीन चावर |
|---|---|
| सेरी | ५॥।३ |
| इनामती | ५०॥।५॥ |
| ठिकणाती | २॥।१५ |
| वसाती व जात्रा | ५१२०॥।३ |
| खालीसाती | २६०१८॥२ |
| | ९१०३ |

| अवल | दूम | सीम |
|---|---|---|
| ५॥।३ | ० | ० |
| ४५०१२।२ | ५॥२३०३ | ० |
| २॥।१५ | ० | ० |
| ४१२०॥।३ | १ | ० |
| ०२० | १८॥।२८॥२ | ७ |
| ५८।११। | २५॥२१॥। | ७ |

येकून जमा बेरीज

खुर्दा टके गला केली खडी

यासि ता

ता मुजेरी जमीन चावर ११००३ पैकी वजा बाद बाजर चावर १९ बाकी जमीन चावर ९१०३ बिता

| अवल | दूम | सीम |
|---|---|---|
| ५८।११। | २५॥११॥। | ७ |

पैकी वजा अवल चावर

२॥।१५ ठिकणाती कणसारा

५॥।३ सेरी व खासबाग

०२० मला

८॥।८

बाकी जमीन चावर ८२०२५

दर मा येकून जमा टके

५९४३। अवल चावर ४९॥३। दर चावर टके १२० येन

२३११।३ दूम चावर २५॥२१॥। दर चावरे टके ९० यो

४२० सीम चावर ७ दर चावरे ६० यो

८६७४॥३

पैकी वजा मो सता* गला दर चावर सडी ३ यो गला सडी २४६॥२॥ दर सडीस टके १० येकून टके २४६६१ बाकी जमा येरीज

दुर्दी टके ६२०८।३ गला कैली सडी २४६॥२॥

टिकणाती कणसारा जमीन चावर २॥१५ यो येरीज

नक्द टके मा सारा दर चावर गला दर चावर सडी ८

टके २० यो टके ५७॥ ———गला सडी २३

सेरी व+ सास याग जमीन चावर ५॥३ दर चावर सडा १२ येकून गला सडी ६६।१

मला ता माली जमीन विघे ८२० दर विघेस टके ३८२॥ येकून टके ६१८२

नेरीज यक्दर

| ———जमीन | | ———टके |
|---|---|---|
| मुजेरी | ८२८२५ | ६२०८।३ |
| ठिकणाती | २॥१५ | ५७॥ |
| सेगी | ५॥३ | ० |
| मला | ८२० | ६१८२ |
| | ६१८३ | ६३२६॥५ |

गला सडी २४६॥२॥
२३
६६।१
०
३३८॥३॥

पैकी अजी दुमले याद जमान चावर

५१२०॥३ विता

अवल चावर वसाती जात्रा दूम चावर

१

शाहार चावर ४१२०॥३

येकून आकार टके

५३१ अवल ४१२०॥३ दर चावर टके १२० यो

९० दूम चावर १ यक

६२१

* सता असेंहि वाचन होईल + ओळीवर पण तेव्हांच लिहिलें आहे.

पैकी घजा खरीदी गला दर चापर खडी ३ येकून गला। खडी १६।।३ दर खडीस टके १० येकून टके १६२॥१०॥ बाकी जमा बेरीज

नक्द टके ४५८।१॥ गला खडी १६।।३०

बाकी जमा बेरीज

नक्द टके ५८६८॥३॥ गला खडी ३२२॥३८१

येकून घडणी होन पा

४८९०। खुर्दा टके ५८६८॥३॥ दर होनास टके १२ यो

८०६॥-८- गलाखडी ३२२॥३८१ दर खडीस होन २॥ यो

१२९५॥

दर होनास रुा ३॥ यो ४८५८॥ रुपये

बा मोहनरफा हुडा होन ३००

पैकी वजा मजुरा होन ७५॥

बिता

मजुरा तक्सीम पाचवी होन ५७॥- करि भाडे होन ५

सोडी होन १२॥-

बाकी होन २२४- दर होनास रुपये ३॥ येकून रुपये ८४१

तेरीज येकदर रुपये

४८५८॥ ना मुनेरी

८४१८- ना मोहनरफा

५७००

( कागदास तीन जोड आहेत )



## शिवचरित्रसाहित्य खंड ८

# सूची

नांवापुढलि आंकडा पृष्ठांक होय. जेथें तो आंकडा लेखांकाचा आहे तेथें ले. असें म्हटलें आहे. कंसांत नांवाचा शककाल दिला आहे. प्रारंभी विषयसूची स्वतंत्र दिली आहे. येथें व्यक्तिस्थलनामेंच तेवढीं नेहमीप्रमाणें घेतलीं आहेत. सूचींत अनुस्वारांकित शब्दांची स्वतंत्र बाराखडी स्वर झाल्यावर दिली आहे.

# भारत—इतिहास—संशोधक—मंडळ

वर्ष २३ वें ] **त्रैमासिक** [ अंक २ रा


## निवेदन

मागचा अंक आषाढ शु॥ १ ला, वाढदिवसाच्या दिवशीच प्रसिद्ध झाला त्यापूर्वी त्या दिवशीं झालेल्या समारंभाची हकीकत देतां आली नाहीं ती या अंकांत दिली आहे. दोन तपांवर मंडळाची कार्यधुरा आवडीनें वाहणारे मंडळाचे जणूं दुसरा प्राण असे प्रो. दत्तोपंत पोतदार यांची तसबीर त्यांच्याच दीर्घकाळच्या सन्मित्रांनीं जी मंडळास अर्पण केली तिचें समारंभानें अनावरण रा. ब. नानासाहेब सरदेसाई यांच्यासारख्या *इतिहासतपस्व्याच्या हातून झालें याबद्दल अनेकांना फार समाधान वाटलें.* अशा प्रसंगानें जुने, [illegible] गैरसमज वितळले जाऊन व नवीन शुद्ध वातावरण निर्माण होतें.

समारंभप्रसंगीं रा. ब. सरदेसाई यांनीं जें पोतदारगुणदोषविवेचनपर भाषण केलें व *हिंदु-मुसलमान संबंधक ऐतिहासिक प्रबंध सादर केला हीं दोन्ही सह्याद्रीच्या* संपादकांनीं लगोलग आपल्या अंकांतून प्रसिद्ध केलीं तसेंच त्या दिवशीं सायंकाळीं सौ. डॉ. इरावतीबाई कर्वे यांनीं जें सुंदर समाजशास्त्रीय व्याख्यान दिलें तेंहि सह्याद्रीच्या चालू अंकांत आलें आहे याबद्दल आम्ही सह्याद्रीच्या संपादकांचे फार आभारी आहों.

* * *

या त्रैमासिकाचें स्वरूप निराळें म्हणजे **संपूर्णग्रंथाचें** आढळून येईल. मंडळांत आरंभापासून आजपर्यंत पाक्षिक सभा-संमेलनें व वाढदिवस यांतून जी कागदपत्रें, टांचणें, निबंध वगैरे वाचले गेले त्यांपैकीं बरेचसे अद्याप अप्रसिद्ध राहिले होते ते सर्व काढून (१) शिवचरित्र साहित्य खंड (२) ऐतिहासिक संकीर्ण साहित्य व (३) निबंध अशा क्रमानें प्रसिद्ध करण्याचें ठरविलें व त्यांतील पहिला भाग हा **शिवचरित्र साहित्य खंड ८** होय. पुढील पौषाचा अंक ऐतिहासिक संकीर्ण निघेल. या योजनेमुळें सर्व शिलकी पत्रें, टांचणें-निबंध प्रसिद्ध होतील व सभासदांना या ग्रंथांची त्रैमासिक द्वारां फुटकळ पानें मिळण्याऐवजीं एक एक भरीव ग्रंथ दर तीन महिन्यांनीं मिळेल. अर्थात् हें शिलकी साहित्य संपल्यावर त्रैमासिक पुन्हां पूर्वीच्या पद्धतीनें चालेल.

* * *

मंडळाचा दफ्तरखाना लावला जात आहे तुळशीबागवाले, चिंचवड संस्थान यांच्या व इतरांच्या कागदांचीं जीं पोतीच्या पोतीं मंडळांत बराच काळ असंशोधित राहिलीं होतीं त्यांची स्थूल पाहाणी–तपासणी आतां पुरी झाली यानंतर सूक्ष्म व अंतर्गीय विषय–व्यक्तिवार वर्गीकरण होईल या झालेल्या कामाचें श्रेय कारभारी मंडळाचे एक सभासद व प्रसिद्ध इतिहास–संशोधक कृष्णाजीपंत पुरंदरे यांना दिलें पाहिजे ते मंडळांत ठाण मांडूनच बसले आहेत व त्यांच्या या कार्यतत्परतेची व चिकाटीची मंडळाला देणगीच आहे, असें यथार्थतेनें म्हणता येईल श्री पुरंदरे मास्तर यांचा अशा कामीं मंडळाला चिरकाल उपयोग होईल अशी खात्री वाटते

मंडळांत जेवढे म्हणून कागद आहेत त्यांची नोंद करण्याचें काम चालूच आहे. पोथ्यांचीहि नोंदणी व जंत्री सुरू आहे. अशा कार्याला निरलसतेनें वाहून घेतलेली व मुद्दाम किंवा फारशा मोबदल्याची अपेक्षा नसलेलीं सेवानिवृत्त किंवा मुबलक वेळ असलेलीं माणसें जेव्हां बरींचशीं लाभतील तेव्हांच मंडळांतील संग्रह सुव्यवस्थित लागेल तानडतोब चटपट सरकारी पद्धतीनें कामें करून घेण्यास अशा सार्वजनिक संस्थेपाशीं द्रव्यबल नसतें तेव्हां जें ज्या वेळीं होईल तें कसें तरी साधून घ्यावें लागतें

*          *          *

दिल्लीच्या इंपीरिअल रेकॉर्डमधील मराठी कागदांच्या नकला ज्या, मंडळाचे एक संशोधक–सेवक रा. शंकरराव जोशी यांनीं गुद्स्ता केल्या त्या ग्रंथरूपानें प्रसिद्ध करणें आहे दुसरा एक फार महत्त्वाचा पत्रसंग्रह दुसरे संशोधक–सेवक रा. खरे यांनीं मिळविला आहे. तो म्हणजे मराठ्यांचे दिल्ली येथील वकील हिंगणे यांचा अस्सल पत्रव्यवहार होय हीं सुमारें २०० पत्रें आहेत यायोगें नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दीवर नवा प्रकाश पडेल हाहि संग्रह विवेचक प्रस्तावनेसह लवकर छापण्याचें मनांत आहे पैशाची जशी सवड होईल त्याप्रमाणें ग्रंथप्रकाशाचें काम चाललें एकदम याच कार्यासाठीं देणगी देणारा कोणी मुक्त दाता उभा राहिला तर लगेच मुद्रा छापखाना गांठील.

*          *          *

मंडळाची आवक जास्त सभासद वाढून किंवा धन्याढ्य वार्षिक देणग्या मिळून फुगत राहिल तर कितीतरी आवश्यक पण द्रव्याभावीं तुंबलेलीं संशोधकीय कामें उरकतां येतील गेल्या निगरनापासून येथील नगरपालिकेचें लक्ष मंडळाकडे आहे ही फार सुलक्षण गोष्ट आहे. पुणें नगरसंशोधनाचें कार्य नगरपालिकेच्या जिव्हाळ्याचेंच आहे, तेव्हां तें मंडळ करीत आहे हें एका अर्थी नगरपालिकेला प्रिय व उपयुक्तच असणार पुण्याचा साधार सविस्तर इतिहास लिहिण्याचें निरपा फार दिवसांपासून मनांत आहे व त्याप्रमाणें कांहीं अपेक्षा प्रयत्नहि झाले तथापि अद्यापि तो इतिहास निघाला नाहीं तेव्हां मंडळाच्या निकट सहकार्यानें पुणें नगरपालिकेला हें व इतर कांहीं उद्दिष्टें पार पाडतां येतील.

यंदा अंदाजपत्रकांतच ५०० रु. ची देणगी पुणेंनगरपालिकेनें मंडळासाठीं म्हणून स्वतंत्र नियुक्त केली होती ती मुक्तीच मिळाली. या देणगीबद्दल मंडळ या नगरसंस्थेचें फार ऋणी आहे.

मंडळाच्या चालू कार्यालाव पुणें नगर संशोधनवृत्ताच्या पुढील खंडाला या देणगीची मदत होणार आहे. वृत्ताचा पहिला खंड बऱ्याच लोकांना आवडलेला दिसला. दुसरा खंड यापेक्षां पद्धतशीर व आणखी बरीच माहिती देणारा निघेल अशी ग्वाही देतों.

* * *

१८६४ चें नवें साल निम्में संपलें. अद्यापि बऱ्याच सभासदांकडून वर्गणी येणें आहे. या वर्गणीवरच मंडळाच्या एकंदर खर्चाची मदार. तेव्हां आमच्या थाकीदार सभासदांनी मंडळाविषयीं पूर्वीप्रमाणेंच काळजी बाळगून आपली राहिलेली वर्गणी पाठवावी अशी विनंति आहे.

**चिटणीस**

---

# मंडळाचा बत्तिसावा वाढदिवस

व

## प्रा. पोतदार यांच्या तसबिरीचें अनावरण

हा जोड समारंभ श. १८६४ आषाढ शु. १ [ ता. १७।६।४२ ] रविवार ह्या दिवशीं उत्तमप्रकारें साजरा झाला. सकाळीं मंडळाचे माजी चिटणीस व सांप्रतचे कार्याध्यक्ष प्रा. द. वा. **पोतदार** ह्यांच्या, त्यांचे मित्र श्री. **धों. कृ. साठे** ह्यांनीं मंडळास दिलेल्या, तसबिरीचें अनावरण मोठ्या समारंभानें झालें. ह्या प्रसंगास अध्यक्ष म्हणून रा. ब. **गो. स. सरदेसाई** हे लाभले होते. मंडळाचा प्रतिवार्षिक वाढदिवससमारंभ आणि त्यांत ह्या योग यामुळें ह्या समारंभास पुष्कळच विद्वान्, प्रतिष्ठित व अधिकारी मंडळी आली होती.

प्रथम, चिटणीस श्री. **चिं. ग. कर्वे** ह्यांनी सभेचा उपक्रम केला. ते म्हणाले, मंडळाचा आजचा वाढदिवस अभिनवपूर्ण आहे. वाढदिवस म्हणून आनंद वाटत आहे; आणि त्यांतच आणखी आपल्या मं. चे एक विद्वान् कार्यकर्ते ह्यांच्या प्रदीर्घकालीन कामगिरीचें स्मरण म्हणून त्यांची प्रतिमा मंडळांत तशाच थोर व अधिकारी गृहस्थाचे हस्तें ठेवण्यांत येत आहे ह्यामुळें वाटणाऱ्या आनंदानें तो खरा वर्धमान व सार्थ वाटत आहे. आणि ह्याचें श्रेय मुख्यतः रा. ब. सरदेसाई ह्यांस आहे, हें आधींच सांगून त्यांनी आतां अध्यक्षपद स्वीकारून कार्यक्रमास प्रारंभ करावा असें सुचविलें. ह्यानंतर रा. ब. सरदेसाई हे अध्यक्षस्थानीं बसले व प्रा. पोतदारांच्या तसबिरीवरील पडदा दूर करून

तसबिरीस व प्रा पोतदार यांस पुष्पहार समर्पण केला नतर सरदेसाई यांनी आपलें भाषण वाचून दाखविलें (हें भाषण सह्याद्रि १९४२ जुलैच्या अकामध्यें पृ ४९१–९५ साथ आलें आहे.) ह्यानतर मडळाचे माजी अध्यक्ष व प्रस्तुतचे विश्वस्त श्री **न चिं केळकर** ह्यांचें भाषण झालें तायासाठो म्हणाले, एखाद्याची तसबीर ठेवावयाची व ताहि मडळासारख्या जागी, म्हणजे त्यासबधींची कांहीं वैशिष्ट्यें आहेत विद्वान दाता, कार्य कर्ता आणि तोहि गत अशांपैकी जो असेल त्याची तसबीर ठेवावयाची पण म नें आजच्या प्रसंगानें आणखी एका प्रकारानें उचित अशी भरच घातली आहे. म०ला आजचें हें विशाल स्वरूप ज्यांच्या कारकीर्दीत आलें त्यांतील एकच व्यक्ति म्हणून अगुलि निर्देश करणें झाल्यास प्रा पोतदार ह्यांचेचकडे बोट दाखविणें भाग आहे. ह्या दृष्टीनें आणि ह्याहून मुख्यत सांगावयाचें तर इतउत्तर मडळाचें अधिक कार्य पोतदारांच्याकडून व्हावें म्हणून उत्तेजनार्थ ही गोष्ट आज होत आहे ह्यानतर रा सा बाबासाहेब देशपांडे ह्यांचें थोडक्यांत भाषण झाल्यावर श्री **श ना. जोशी** ह्यांचं भाषण झालें त्यांनी सांगितलें—आजच्या प्रसगानें तीन गोष्टी उघड होतात सशोधन आणि सकल्न एकरूपतेनें आणि एकमेकांच्या गौरवानें नांदतात ही पहिला गोष्ट, दुसरी गोष्ट की, मडळांत आजचे अध्यक्षांचा गौरव त्यांच्या मराठी रियासतीचा अखेरचा भाग त्यांजकडून प्रसिद्ध झाला तेव्हा व्हावा ही जी इच्छा ती एकाप्रकारें आज पुन फलप्रद होत आहे आणि रा. ब सरदेसायांचा गौरव ज्या मडळाच्या चिटणीसांच्या अध्यक्षतेखाली पूर्वी अन्यत्र झाला त्या प्रा पोतदारांचा गौरव रियासतकार सरदेसाइ यांच्या अध्यक्षतेखालीं आज होत आहे ही दुसरी उत्तम गोष्ट, आणि तिसरी गोष्ट म्हणजे मडळाचें नाव ज्याच्या भारतीय लौकिकाबरोबर साथ झालें आहे अशाचें छाया चित्र मडळात ठवलें जात आहे, ही होय ह्यानतर **प्रा शेजवलकर** ह्यानी भाषण करून प्रा पोतदारांच्या अनेकव्यवसायित्वाची व प्रतिभेची माहिती देऊन पुढील वाढदिवस समारभप्रसगी आजचे अध्यक्ष व श्री द वि आपटे ह्यांच्या तैलचित्राचें अनावरण व्हावें व ती गोष्ट आपण घडवून आणू असें सागितलें नतर पोतदारांचे सहकारी चिटणीस व आजचहि चिटणीस श्रीमत **सरदार मुजुमदार** ह्यांनीं भाषण करून पोतदारांचेविषयी कांहीं आठवणींचे प्रसग सांगून अभिनदन केलें नतर **श्री धोंडुमामा साठे** ह्यानीं सगद्गदित होऊन दोनच वाक्यांत भाषण केलें जी तसबीर आज मी मडळाकडे दिली ती १२–१४ वर्षांपूर्वीच सिद्ध झालेली आहे पण प्रो पोतदाराच्याच नकारामुळें ती आतापर्यंत मला देतां आली नाही ती हरकत प्रस्तुत दूर होऊन आज मडळात तसबीर ठेवली जात आहे ह्याबद्दल मी पोतदारांचें अभिनदन करतों व मला जी गोष्ट व्हावी असें वाटत होतें ती घडत आहे हें पाहून समाधान होत आहे नतर **श्री द वि आपटे** ह्यांनीं अस प्रसग कोणाचे व्हावे, होतात, ते कसे होतात हें सांगून त्यांनं प्रो पोतदारांचा हा प्रसग झाला, हें किती उचित आहे हें सांगितलें मुख्यत मजवर जो

प्रमग माझे मित्र आणू पाहात आहेत, ती गोष्ट त्यांनीं मुळींच करू नये, हें परोपरीनें त्यांनीं सांगितलें नतर प्रा पोतदार यांचें भाषण झालें ते म्हणाले, प्रथम मला हें सांगितलें पाहिजे कीं, आजच्या गौरवप्रसगांत श्री सर आचासाहेब मुजुमदार हे माझे सहभागी आहेत मी मडळांत व मडळासाठीं जें कार्य केलें त्याहून अधिक व वेगळी अपेक्षा कोणाची नसणार असें नाहीं पण मी आहें हा असा आहें आतां त्यात उत्तेजन देऊन बदल होईल असें फारसें नाहीं एक तर असें कीं, केलें तें वाटलें म्हणून केलें उत्तेजनापेक्षनें केलें नाहीं आणि दुसरें असें कीं केल्याबद्दलच जेथें बोललें जातें, म्हणजे पावतीच जेथें मिळते, तेथें उत्तेजनाची भाषा काय होय! लोकांच्या अपेक्षा असणें हें ठीक आहे; पण मला माझा म्हणून कांहीं आवडनिवड आहे व त्या अनुसारच माझीं पावलें पडणार माझ्या प्रथमप्रह्नविषयीं आज व एव्हवीहि बोललें जातें तो लावण्याचें माझें काम मी लवकरच उरकणार आहें आणि त्यांतील बरीच पुस्तकें अशीं आहेत कीं त्यांची मडळाला कांहीं तादृश आवश्यकता नाही कांहीं दुबारहि होतील म्हणून माझ्या समग्रहाची मी योजना केली आहे व ती योग्य वेळीं सर्वांना कळेल मडळाच्या कार्याच्या वाढीसाठीं इयजीमधून लिखाण करावें असा एक पक्ष आहे व तो अनुपयोगी निश्चित नाहीं पण प्रथम मराठीचें पोट भरू द्या मग अन्य भाषा दुसरें असें कीं, दुसऱ्यांनीं हें काम केलें तर तो श्रमविभाग उपकारकच होईल मी उद्यां मडळाशीं आजच्या इतका सबद्ध न राहिलों तरी मला त्यावेळीं माझें करणें म्हणून कांहीं शिल्लक राहीलच व यासाठीं माझे हातून जें होईल तें होईलच शेवटीं असाच सर्वांचा लोभ अपेक्षून कांहीं अल्पस्वल्प आणखी कार्य व्हावें ही इच्छा व्यक्त करून आजच्या गौरव-प्रसगाबद्दल आभार मानून भाषण पुरें करतों

नतर अध्यक्ष रा ब सरदेसाई ह्यांना हार घातला त्याचे व आलेल्या मडळींचे आभार मानून झाल्यावर हा समारम सपला

ह्या प्रसगीं रियासतकार सरदेसाइ यांचें स्वतत्र निबधवाचनहि व्हावयाचें होतें पण वेळ उरला नाहीं तोहि निबध सह्याद्रीमध्यें( इ १९४२ आगष्ट पृ ५२९-३३ ) प्रसिद्ध झाला नतर दुसरीं कार्यक्रमपत्रिकेंतील कांहीं निबधवाचन झालें व शेवटीं डॉ सौ इरावतीबाई कर्वे यांचें 'महाराष्ट्र वसाहतीच्या शोधा' ची एक दिशा ह्या विषयावर त्यांनीं परिश्रमपूर्वक चालविलेल्या प्रयत्नामुळें विविध माहितीनें भरलेलें असें सुश्राव्य भाषण झालें ( हें भाषण नुकतेंच सह्याद्रीच्या आकारावर अन्नात आलें आहे ) याप्रमाणें हा वाढदिवससमारंभ समाप्त झाला

---

# मंडळ-वृत्त

## पाक्षिक समावृत्त

गेल्या म्हणजे आषाढ ते भाद्रपद (अधिक महिना धरून) ह्या तिमाहींत पांच पाक्षिक सभा झाल्या त्यांत वाचले गेले ते निबंध येणेंप्रमाणें—

| पा स | निबंधलेखक | निबंध |
|---|---|---|
| ४ | श्री श ना जोशी | (११) तर्फ सोंदळचे मुकादम मराठे यांचे ऐ कागद व प्रत्यक्ष मुद्रा वस्तुप्रदर्शन |
| „ | श्री य द आपटे | (१२) थोरले बाजीरावाची गयासखानासह शाहूस भेट |
| | श्री श ल वैद्य | (१३) रघोजी भोसले ह्यांचीं दोन पत्रें |
| „ | श्री ग ह खरे | (१४) त्रिंबक येथील तोफेवरील लेख |
| ५ | „ „ | (१५) बाळाजी बाजीरावाचीं दोन महत्त्वाचीं पत्रें |
| „ | (श्री य न केळकर-मार्फत श्री रा ना केळकर गोवा) | (१६) कांहीं विशिष्ट चालीरीति |
| „ | श्री शां वि आवळसकर | (१७) चौलच्या अधिकारी दप्तरांतील पत्रव्यवहार |
| „ | श्री य दु देशपांडे | (१८) दुसऱ्या बाजीरावाचा कौटुंबिक पत्रव्यवहार |
| ६ | श्री श ना जोशी | (१९) दुतर्फा अमल ? |
| „ | „ „ | (२०) श १५९७ मधील रहिमतपूर गांवची मोजणी |
| „ | श्री य रा गुळे | (२१) एक सुंदर कुबेरमूर्ति |
| „ | श्री य द आपटे | (२२) मुसामुसींची इंग्रजाविरुद्ध तयारी इ १७८२-८३ |
| „ | श्री चिं ग कर्वे | (२३) पत्रावरील शिक्क्यांचें महत्त्व कांहीं मुद्रितपत्रें प्रदर्शन इ १६९८-१७७५ |
| „ | श्री ग ह खरे | (२४) मराठे रजपूत-दुर्गामर्दनपर्धी कांहीं पत्रें |
| ७ | श्री श ना जोशी | (२५) थोर पेशव्यांचा मानी श्रीरंगराव यांचा शहा |
| „ | श्री रू पा पुरंदरे | (२६) जाणास नसें=टोकणाचा धपपा रोख्यावर |

| पा. स | निबंधलेखक | निबंध |
|---|---|---|
| ,, | श्री रु. वा पुरंदरे | (२७) तुळापूर–अमहाराचे तक्सीमदार |
| ,, | श्री श ल वैद्य | (२८) गणपतराव परशुराम पटवर्धन तासगांवकर यांचा कँ मनरोबिरावर झालेला तहनामा |
| ,, | श्री त्रिं आ देव | (२९) गगाखेड येथील गणपति |
| ,, | श्री ग ह. खरे | (३०) हिंगणे यांच्या वकिलीसंबंधी दोन पत्रें |
| ८ | श्री रु वा पुरंदरे | (३१) पेशवाईतील गृहस्थी मुलांचें माध्यमिक शिक्षण |
| | , | (३२) सचिवांच्या साहोत्र्याचीं तुटलेलीं पत्रें |
| | | (३३) थेऊर येथील शिंगणराजाचें स्मृतिस्थान |
| ,, | श्री ग ह. खरे | (३४) शितोळ्यासंबंधी दोन फारसी कागद |
| | ,, | (३५) काहीं नाणीं |
| ,, | श्री श ल वैद्य | (३६) पचायतीचे जुने कागद |
| ,, | श्री वि अ कानोले | (३७) श्री ज्ञानेश्वर परंपरेंतील एक अज्ञात मुकुंदराज व तत्कृत 'योगविवकमार्तंड' |

---

## पुणें नगर-संशोधन पाक्षिक सभा

[ त्रै वर्ष २१ अ ३ पृ ८८–९१ वरून पुढें चालू ]

| पा स | निबंधलेखक | विषय |
|---|---|---|
| २३–५ २-४१ | श ना जोशी | ६५ शुक्रवार पेठेंतील कोल्हटकरांच्या घराचें खरेदीपत्र |
| | चिं ग कर्वे | ६६ हस्तासान्यातील हत्ती |
| २४–१९ २ ४१ | श ना जोशी | ६७ सरदार रास्ते यांनीं शहरांत आणिलेले पाणी |
| | चिं ग कर्वे | ६८ तुळशीबाग संस्थान |
| | | ६९, ७० पर्वती बाग व नहर |
| २५–२ ७ ४१ | श ल वैद्य | ७१ विश्रामबाग वाडा |
| | श ना जोशी | ७२ एरंडवणे कागद |
| | चिं ग कर्वे | ७३ पर्वतीजवळील आंबराई |
| २६–१५ ७ ४१ | ,, | ७४ कचार मठ |
| | श ना जोशी | ७५ गोपाळ जनार्दन चित्राव |
| | चिं ग कर्वे | ७६ गुरुवार पेठेची परपट्टी |

| पा स. | निबंधलेखक | विषय |
|---|---|---|
| २७–३०-७ ४१ | श ना जोशी | ७७ पिंपळखरे यांचें घर |
| | चिं ग कर्वे | ७८ आंतील ओढा |
| २८–१३ ८-४१ | श ना जोशी | ७९ पुण्यांतील सडका व देवालयें |
| | य रा गुप्ते | ८० भावुर्ड्यांची ऐक्विात माहिती |
| | चिं ग कर्वे | ८१ जुन्या मडईचा कौल |
| | " | ८२ मोरोबादादा फडणीसबाग |
| २९–२७ ८ ४१ | सरदार मुजुमदार | ८३ अबरखाना |
| ३०–१० ९ ४१ | रू वा पुरंदरे | ८४ पुणें राजवाग पेठ |
| | य न केळकर | ८५ सन १८४५ सालांतील पुण्यांतील ब्राह्मण धर्म |
| | चिं ग कर्वे | ८६ गुरुवार पेठ सानेगुमागी व शेटेपण |
| ३१–२४ ९ ४१ | श ना जोशी | ८७ रविवार पेठेची वसाहत |
| | रू वा पुरंदरे | ८८ शहरात सूचनेसाठीं उडणाऱ्या तोफेचा उल्लेख |
| ३२–५-११ ४१ | चिं ग कर्वे | ८९ दहा तोंडाची देवी |
| | " | ९० वैद्यखाना |
| | , | ९१ पोथ्या |
| | " | ९२ तुळशीबागेचे पुजारी जोशी यांचा वाडा |
| | , | ९३ बाजी भिवरावाचा वाडा |
| | " | ९४ जागेची हद्द ठरविण्यास गीतेचा उपयोग |
| ३३–३ १२-४१ | " | ९५ मुजेरीबाग |
| ३४–७–१–४२ | " | ९६ कारकोळ पुण्यांतील नरसोबाचें देऊळ |
| | " | ९७ परवाना बिल्ला |
| | " | ९८ एरंडवणें येथील जमिनीबाबत कतबा |
| ३५–२१ १ ४२ | , | ९९ मुर्ते बाण्याबद्दलचा अर्ज |
| | " | १०० तोफखान्याच्या जागा |
| | " | १०१ पुणें गांवाबाहेर जाण्याचे दोन मार्ग |
| | , | १०२ सुभानशा बगला |
| | " | १०३ सदाशिव पेठ ठोसराकडे |
| | | १०४ घोरपडी बाग |
| | , | १०५ भावबड्यातील पेठे वाडा |
| | " | १०६ पिराचें तळें |

| पा. स | निबंधलेखक | विषय |
| --- | --- | --- |
| ३६–४ २ ४२ | चिं ग कर्वे | १०६ ठोसर घराणें व सदाशिव पेठेंतील होळकर |
| | शा ल वैद्य | १०७ रास्ते वाड्यांतील नळ फोडला |
| ३७–४ ३ ४२ | शा ना जोशी | १०८ गुरुवार पेठेंतील वस्ती |
| | शा ल वैद्य | १०९ पुणें नगरवाचनालयाची जागा |
| ३८–१८ ३ ४२ | मा द वा पोतदार | ११० कासार विहीरीचा जार्णोद्धार |
| | चिं ग कर्वे | १११ भाऊ महाराज बाग |
| | ” | ११२ मुजेरी |
| | ” | ११३ डेंगळ्याचा तोफखाना |
| | ” | ११४ तुळशीबागेंतील मोकाट गुरें |
| | ” | ११५ पिलखान्यांतील हत्ती |
| ३९–१० ६ ४२ | चिं ग कर्वे | ११६ हुडीवाले साठे व रमण्यांतील भोजन |
| | द वा पोतदार | ११७ वेल्हारे जोशी यांच्या फारसी सनदा |
| | बा या राजे घोरपडे | ११८ सदाशिव पठेंतील सांडेकर वाडा |
| | ल ना जोशी | ११९ कृष्णेश्वर |
| ४०–२४ ६ ४२ | द वा पोतदार | १२० केसकर विठोबा |
| | चिं ग कर्वे | १२१ रूपराम चौधरींचा वाडा, हौद व बाग |
| | ल ना जोशी | १२२ खुन्या मुरलीधर |
| | शा ल वैद्य | १२३ घच्याजापत भानु यांचा वाडा |
| | बा या राजे घोरपडे | १२४ शेलूकर वाड्याचें खरेदीखत |
| | शा ना जोशी | १२५ ल ना जोशी यांचे घराचे खरेदी पत्र शुक्रवार पेठ |
| ४१–८ ७ ४२ | शा ल वैद्य | १२६ कृष्णाजी हरी चिपळोणकर यांचें पत्र |
| | चिं ग कर्वे | १२७ शनिवार पठेंतील गस्त |
| | | १२८ पागोळ्याच्या पाण्याबद्दल तटा |
| | | १२९ डयूक एडिंबरो बुधवार वाड्यावरील घड्याळ |
| ४२–२२ ७ ४२ | | १३० इंग्रज सरकार व रामनवमी |
| | ” | १३१ तुळशीबागेनजीक गायकवाड सिलेदाराचें घर |
| | | १३२ तुळशीबागकरांची पागा |
| | | १३३ रामचंद्र नारायण यांची विपन्न स्थिति |
| | शा ना जोशी | १३४ तुळशीबागकरांचें कांहीं पूर्ववृत्त |

| पा. स. | निबंध लेखक | विषय |
| --- | --- | --- |
| ४२–२२ ७ ४२ | य रा गुप्ते | १३५ चिटणीस व सखारामपंत बोकील यांचे पुण्यातील वाडे |
| ४३–५ ८ ४२ | ल ना जोशी | १३६ कर्वे, भागवत आणि जोशी |
| | चिं ग कर्वे | १३७ तुळशीबागकर दप्तरांतील गुरुवार पेठेंतील कमावीस |
| ॥ | | १३८ इ १७९४ तील दस्तक |
| | श ना जोशी | १३९ मंडळ संग्रहातील पुणें नगरासंबंधींचा टिप्पणें–पटवर्धन आचार्य इ चीं |
| ४४–१९ ८ ४२ | कृ वा पुरंदरे | १४० गुरुवार पेठेंतील घराची मोजदाद |
| | " | १४१ पर्वतीचा नंदा व विठ्ठलवाडीचा विठोबा |
| | श ल वैद्य | १४२ फुलाजी सरवदा वस्ती पुणें पेठ गज याचा शके १८६४ मधील कजरोखा |
| | श्री चिं ग कर्वे | १४३ सिराजोद्दौलेसंबंधी कज्जा |
| ४५–१ ९ ४२ | श्री कृ वा पुरंदरे | १४४ श्री आइ आदि पुरुषाचे पुण्यांतील स्थान |
| | श्री चिं ग कर्वे | १४५ कात्रजचा तलाव |
| | | १४६ तुळशीबागेंतील दप्तर |
| | श्री श ना जोशी | १४७ गुरुवार पेठेंतील राजगुरु ह्यांच्या घराची खरेदी |
| | श्री य रा गुप्ते | १४८ नागेश्वर |

नगर संशोधनार्थ फेरा– ता १६।११।४१ रोजीं सायंकाळीं दहा तोंडाची देवी, नवलोबा पर्वती गांवचा तट, ओढा इ चीं पाहाणी

---

## ग्रंथालय

शक १८६४ आषाढ शुद्ध १ पासून भाद्रपद वद्य ३० पर्यंतच्या तिमाहींत मंडळ ग्रंथालयास देणगीदाखल व अभिप्रायार्थ आलेलीं पुस्तकें

| ग्रंथकार | ग्रंथनाम | देणगी देणार |
| --- | --- | --- |
| आल्ये कृ ना | गीतापद्यमुक्ताहार | हणमंते श्री शा |
| इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशन् | प्रोसिडिंग्स ऑफ मीटिंग्स हेल्ड ॲट् मायसोर खंड १८ | गव्हर्नमेंट ऑफ इंडिया |
| ओतूरकर रा वि | हिंदुस्थानचा सांपत्तिक इतिहास | ओतूरकर रा वि |

| ग्रंथकार | ग्रंथनाम | देणगी देणार |
| --- | --- | --- |
| कमिसारियट | हिस्टरी ऑफ गुजरात व्हॉ. वन् | डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन |
| करंदीकर वा ना | दहा हजार वर्षांचें कॅलेंडर | कळकर बदर्स |
| के जी आर | ए गाइड टु दि ऑबझरवेटरीज ॲट दिल्ली, जयपूर, उज्जनी ॲन्ड बनारस | मराठे ग स |
| खुपेरकरशास्त्री वा मा | श्रीसनत्सुजातपर्व ( सुरस मराठी भाषांतर ) | ठकार वा पां. |
| गोविंद कौल | हानिम्स टेल्स् ( इंग्रजी भाषांतर ) | गव्हर्नमेंट ऑफ इंडिया |
| तळवलकर वा दा | कर्मसंन्यास व कर्मयोग इत्यादि दहा निबंध | तळवलकर डॉ सोनूमामा |
| तंजोर महाराजा सर्फो जीजासरस्वती महाल लायब्ररी | ए डिस्क्रिप्टिव्ह कॅटलॉग ऑफ दि मराठी मॅन्युस्क्रिप्ट्स ॲन्ड बुक्स व्हाल्युम्स २ व ३ | व्यवस्थापक तंजोर सरस्वती महाल लायब्ररी |
| दफ्तरी के ल | महाभारतीय युद्धकालनिर्णय | आपटे घ द |
| फर्नांडिस मास ए | ॲन्युअल बिब्लिओग्राफी ऑफ इंडियन हिस्टरी ॲन्ड इंडोलॉजी व्हॉ. २ | बाम्बे हिस्टारिकल सोसायटी |
| राजवाडे नरहर यशाराम | श्रीधूतपापेश्वर गंगामाहात्म्य वर्णन | पुराणिक नानासाहेब |
| राजवाडे वि का | नामादिशब्दव्युत्पत्तिकोश | राजवाडे स मंदिर, धुळें |
| रॅस इ डेनिसन् | ॲन् अरेबिक हिस्टरी ऑफ गुजरात व्हा १, २, ३, ४ | गव्हर्नमेंट ऑफ इंडिया |
| लव्ह एच डी | व्हेस्टिजेस ऑफ ओल्ड मद्रास व्हॉ १, २, ३, ४ | गव्हर्नमेंट ऑफ इंडिया |
| लॉ प्रिंटिंग प्रेस | इंडियन कर्पोरेशन् | सडेकर भा द |
| लेले का वा (संपादक) | ईशावास्योपनिषद् (मराठी भाषांतर) | वत्सजोशी श ना थाईकर |
| " | ऋक्संहिता प्रथम मंडलम् ( मराठी भाषांतर ) | " |
| " | काठकोपनिषद् ( मराठी भाषांतर ) | " |
| " | दासोपंताचीं पदें | " |
| " | दुष्यंत शकुन्तलाख्यान | " |
| " | धर्म शके १८१९–३० | " |

| ग्रंथकार | ग्रंथनाम | देणगी देणार |
|---|---|---|
| टेले का ना (संपादक) | पुराणनिरीक्षण | वत्सजोशी श ना वाईकर |
| ,, | सभाष्य भगवत् गीता भाग १ ला अ १-१२, भाग २ रा अ १३-१८ | ,, |
| ,, | श्रीमन्महाभारत आदिपर्व | ,, |
| ,, | मानवधर्मशास्त्रम् अध्याय १-७ | ,, |
| ,, | राज्याभिषेक | ,, |
| ,, | सत्कारादर्श भा १ ला | ,, |
| बुइल्सन् सी आर | ओल्ड फोर्ट बुइलियम् इन् बेंगाल | गव्हर्नमेंट ऑफ इंडिया |
| शास्त्री डॉ हिरानंद | एन्शंट् विद्या त्रिपत्रिकाज् | डायरेक्टर ऑफ आर्किओलाजी बडोदें |
| शेटे वि व्य | पाचे-शेटे कुल-वृत्तांत | शेटे वि व्य |
| ,, | श्रीशुक्लयजुर्वेदीय माध्यंदिन ब्राह्मणांची गोत्रावळी | ,, |
| सरदेसाई गो स | मराठी रियासत (५ पुण्यश्लोक शाहू ६ पेशवा बाजीराव) | सरदेसाई गो स |
| घनश्याम मास्तर | दि डायरीज ऑफ, व्हॉ १-२ | गव्हर्नमेंट ऑफ इंडिया |
| हिल् एस सी | बेंगाल इन् १७५६-५७ व्हॉ १, २, ३ | गव्हर्नमेंट ऑफ इंडिया |

---

## वर्गणदळी

| सदस्य | होते | झाले |
|---|---|---|
| श्री. दा सि खटे पुणें | वार्षिक वर्ग २ | आजन्म वर्ग २ |
| रा श्री. म मटे, ,, | ,, वर्ग ४ | ,, वर्ग ४ |
| श्री. वा. रि कोल्हटकर, पुणें | ,, ,, | ,, ,, |
| श्री. आप्पासाहेब गणपतराव पवार, कोल्हापूर | ,, वर्ग २ | वार्षिक वर्ग ४ |
| श्री. म ह. जोशी, पुणें | ,, ,, | ,, वर्ग ३ |

गेल्या तिमाहींत पुढील सद्‌गृहस्थ मंडळाचे नव्यानें सभासद झाले

## नवीन सभासद

| क्रमांक | सभासदाचें नांव | गांव | वर्ग |
|---|---|---|---|
| २१८१ | श्री काशिनाथ नारायण सहस्रबुद्धे | पुणें | ४ वा |
| २१८२ | श्रीमंत सरदार गोविंद कृष्ण काळे, बी ए, एलएल बी रिटायर्ड डि जज्ज | पुणें | २ वा |
| २१८३ | श्री गणेश कृष्ण जोशी | पुणें | ४ आजीव |
| २१८४ | डॉ विष्णु भास्कर गोवडे | पुणें | ४ वा |
| २१८५ | श्री पांडुरंग रघुनाथ अभिके | पुणें | ४ वा |
| २१८६ | प्रो श्रीपाद राम शर्मा | पुणें ४ | ४ आजीव |
| २१८७ | श्री रघुनाथ महाभद्र भुसारी | हैद्राबाद | ४ वा |
| २१८८ | श्री केशव महादेव वेडेकर | पुणें ४ | ४ वा |
| २१८९ | श्री गणेश बाळकृष्ण निसुरे | पुणें | ४ वा |
| २१९० | श्री आत्माराम गोविंद घेडेकर | पुणें | ४ वा |
| २१९१ | रावबहादूर गणेश विनायक पटवर्धन | पुणें | ३ वा |
| २१९२ | श्री मुख्याध्यापक महिलाश्रम हायस्कूल | पुणें ४ | ४ वा |
| २१९३ | श्री शंकर बळवंत चव्हाण | पुणें | ४ वा |
| २१९४ | श्री गजानन महादेव देशमुख बी ए, बी एससी. | पुणें | ४ वा |
| २१९५ | श्री वामन अनंत उर्फ मामा गरुड पेनशनर पोस्टल डिपार्टमेंट | पुणें | ४ वा |
| २१९६ | श्रीमंत रामराव गोपाळराव उर्फ बाबासाहेब मिराकर जहागीरदार | अहमदनगर | ४ वा. |
| २१९७ | श्री कृष्णाजी हणमंतराव देशपांडे | येळगांव | ४ वा |
| २१९८ | श्री नीलकंठ बळवंत नातू, बी ए, एलएल बी इनामदार | पुणें | ३ आजीव |
| २१९९ | श्री विनायक पांडुरंग बोकील असि एज्युकेशनल इन्स्पेक्टर | पुणें ४ | ३ वा |
| २२०१ | श्री गणेश गोविंद बाध्ये पेन्शनर | पुणें ४ | ४ वा. |
| २२०१ | श्री घनश्याम बाळकृष्ण चिपळूणकर शिक्षक व ग्रंथकार | पुणें | ४ लहा |
| २२०२ | श्री. पुरुषोत्तम सिताराम दीक्षित | पुणें | ४ वा |
| २२०३ | श्री. लक्ष्मण यशवंत कुलकर्णी | ” | ४ वा |
| २२०४ | श्री चिंतामण वैजनाथ भिडे, बी. ए | कल्याण | ४ वा. |
| २२०५ | श्री. दिनकर विष्णु केळकर | पुणें | ४ वा |
| २२०६ | श्री मधुकर मंगेश पाटकर | पुणें | ४ आजीव |

## भेटी

असि मास्तर चिंतामणराव हायस्कूल-शहापूर, श्री प सो अंतुरकर--शिक्षक-सातारा श्री शास्कर-महूकँप, श्री सोनार-शिरवळ, श्री राइरकर-पुणें, श्री महाजन चिंचवने-औरंगाबाद, श्री चक्रदेव-मुंबई, श्री नगरकर-पुणें, श्री भिडे वकील-रत्नागिरी, श्री श्रीधर विष्णू जोशी-सातारा, कुमारि दाते-बारामती, श्री मा वि पातुरकर भानुदास, राजहंस व कुमारा नागपूर व अकोला, श्री समुद्र-पुणें, श्री डाळे-फलटण, श्री वोरील मास्तर-कौंडीन, श्री ग श देव वकील-धुळें, श्री दिवाकर भाइ अंजूरकर, श्री राजेश्वर-ओझा, बनारस हिंदु विश्वविद्यालय, श्री किरपेकर, श्री हिंगोसर्ना-कराची श्री खरे-नाशीक, मिस्टर व मिसेस गोएझ, पुरंदर, श्री देवव्हालकर, श्री कुवल इ इ

**संस्था**--महिलाश्रम हायस्कूल, नू म वि हायस्कूल, हुजूरपागा, हायस्कूल, ट्रे कॉ फार मेन ह्या शिक्षणालयांतील विद्यार्थ्यांमध्यें श्री खरे व श्री जोशी ह्यांनी मंडळासंबंधी ऐतिहासिक विषय घेऊन संशोधनपर माहिती दिली व मंडळ प्रदर्शन दाखविलें

---

## संतोषोद्गार

भा इ स मंडळांतील संग्रह पहाण्याचा फार दिवसाचा मनोरथ आज अंशत तरी पूर्ण झाला मजजवळ असलेल्या एक तासाच्या अल्प कालांत मी येथील निवडक वस्तूंच विहंगमदृष्टया दर्शन घेतलें रा ग ह खरे व श ना जोशी या दोघांनी आस्थापूर्वक या कामीं मला साहाय्य केलें याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. मंडळाच्या कार्यांची प्रशंसा करावी तेवढी थोडी आहे

मु पुणें, दि १०।६।४२ (सही) **मो व गर्दे**
डायरेक्टर आर्किऑलॉजी ग्वालेर

---

I had opportunity of paying a visit to the mandala during my short stay at Poona and I was charmed by the valuable collection of ancient arts & treasures of the Country They are no doubt of immense value from the historical point of view and I am sure will be of great help to research scholars and writers of the history of the culture and civilization of this part of India

(sd) B V Singh
6-7-42